ज्ञानेश्वरीच्या आधारें लिहिलेलीं गीतेच्या श्लोकांवरील

# तीन प्रवचनें

( भाग दुसरा )

प्रा. शं. वा. दांडेकर



किंमत १॥ रुपया

प्रसाद प्रकाशन, पुणें २

ज्ञानेश्वरीच्या आधारें लिहिलेलीं गीतेच्या श्लोकांवरील

# तीन प्रवचनें

( भाग दुसरा )

प्रा. शं. वा. दांडेकर

*

किंमत १॥ रुपया

प्रकाशक :
**मनोहर यशवंत जोशी,**
प्रसाद प्रकाशन,
६८९।२३ सदाशिव पेठ, पुणें २.

◆

किंमत १॥ रुपया

◆

प्रथमावृत्ति
कार्तिक शु. ११ शके १८८२

◆

मुद्रक :
**कृ. धों. भुवड**
श्रीकृष्ण मुद्रणालय,
१७०८ सदाशिव पेठ, पुणें २.

# प्रकाशकाचे चार शब्द



(१) 'इदं ते नातपस्काय' (गीता १८–६७), (२) 'यत्र योगेश्वरः कृष्णः' (गीता १८–७८) व (३) 'भक्त्या त्वनन्यया शक्यः' (गीता ११–५४) ह्या गीतेच्या तीन श्लोकांवर प्राचार्य **शंकर वामन** तथा **सोनोपंत दांडेकर**, एम्. ए. यांनीं लिहिलेलीं प्रवचनें प्रथमतः 'प्रसाद' मासिकाच्या ऑगस्ट १९६० च्या अंकापासून तों ऑक्टोबर १९६० च्या अंकापर्यंत क्रमशः प्रसिद्ध होत आलीं व तींच **'तीन प्रवचनें'** (भाग २ रा) या पुस्तक-रूपानें आज वाचकांच्या हातीं देण्याचा सुयोग मला लाभत आहे, यांत मला आनंद वाटतो.

(१) **'इदं ते नातपस्काय'** (पानें १ ते ३९) या श्लोकावरील प्रवचनांत गीताशास्त्राध्ययनाचा संप्रदाय सांगितला आहे, (२) **'यत्र योगेश्वरः कृष्णः'** (पानें ४० ते ७९) यांत ऐश्वर्य, यश, शाश्वत सुख व खरें समाधान हीं तत्त्वतः कोणाला प्राप्त होतात याचा विचार आला आहे व (३) **'भक्त्या त्वनन्यया शक्यः'** (पानें ८० ते १११) या तिसऱ्या प्रवचनांत परमात्म्याचा अपरोक्षानुभव, त्याचेंच सर्व ठिकाणीं दर्शन व त्याच्याशीं समरसता

हीं कोणत्या साधनानें प्राप्त होतात हें सांगितलें आहे. हीं तिन्हीं प्रवचनें मनुष्यानें आपलें जीवन कसें चालवावें यासंबंधीं मार्गदर्शन करणारीं आहेत व म्हणून तीं सर्वांच्या कामीं येतील अशींच आहेत.

भारतीय तत्त्वज्ञानाचा अभिजात ग्रंथ जो भगवद्‌गीता व त्यावरील श्रीज्ञानदेवांची रसाळ मराठी टीका श्रीज्ञानेश्वरी, या ग्रंथांविषयीं जनतेच्या अंतःकरणांत अधिक आवड निर्माण व्हावी या हेतूनें मीं गेल्या आषाढ शुद्ध एकादशीस प्रा. सोनोपंत दांडेकर, यांचीं **'तीन प्रवचनें'** पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलीं व तदनंतर अवघ्या चार महिन्यांनीं हें दुसरें 'तीन प्रवचनें (भाग दुसरा)' हें पुस्तक आज प्रसिद्ध करीत आहें. तेव्हा प्रिय वाचक ह्या दोन्ही पुस्तकांचा स्वीकार करून सांप्रतच्या जीवनकलहाच्या प्रसंगीं त्याचा योग्य फायदा करून घेतील, अशी उमेद ठेवून हे चार शब्द येथें पुरे करतो.

कार्तिक शुद्ध ११
शके १८८२,
ता. ३०-१०-१९६० } **यशवंत गोपाळ जोशी**

# तीन प्रवचनें

## भाग दुसरा

## १

‘ इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन।
न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ ’

( गीता १८–६७ )

हा जो प्रवचनाचा श्लोक आहे तो गीतेच्या १८ व्या अध्यायांतील ६७ वा श्लोक आहे. या श्लोकाचें महत्त्व काय आहे व ज्ञानेश्वरमहाराजांनीं त्यावर काय लिहिलें आहे, हें सांगण्यापूर्वी या श्लोकाचा थोडक्यांत भावार्थ सांगतों, तो असा – भगवंत अर्जुनाला म्हणतात, “ अरे अर्जुना! ते न वाच्यम् ’ म्ह० तूं ‘ सांगूं नयेस-सांगूं नकोस. ’ काय सांगूं नकोस ? तर ‘ इदं ’ म्ह० ‘ हें ’ अर्थात् ‘ हें गुह्यतम ज्ञान म्हणजेच हें गीताशास्त्र जें मी तुला आतांपर्यंत सांगितलें तें तूं सांगूं नकोस. ’

कोणाकोणाला सांगूं नये तें सांगतात. '**अतपस्काय**' म्ह० 'तपश्चर्या न करणाऱ्याला' म्हणजे 'जो असंयतेंद्रिय असेल, त्याला सांगूं नकोस.' आणखी कोणाला सांगूं नये? तर '**अभक्ताय**' म्हणजे देव व गुरु ह्यांचे ठिकाणीं ज्याची भक्ति नसेल' त्याला, '**कदाचन न वाच्यं**' म्ह० 'केव्हांहि अर्थात् कोणत्याहि अवस्थेंत सांगूं नये. '**च**' म्ह० 'आणि' '**अशुश्रूषवे न वाच्यं**' म्ह० 'जो शुश्रूषु नाहीं अर्थात् ज्याला ऐकण्याची इच्छा नाहीं, त्यालाहि हें गीताशास्त्र सांगूं नये.' '**च**' म्ह० आणि त्याचप्रमाणें '**यः मां अभ्यसूयति तस्मै न वाच्यम्**' म्ह० जो माझा मत्सर करतो त्यालाहि हें गीताशास्त्र सांगू नयेस.' सारांश तपाचरण न करणारा, अभक्त, अमुमुक्षु व ईश्वराचा द्वेष करणारा या चारांपैकीं एकहि दोष जरी असेल तरी त्याला तूं हे गीताशास्त्र सांगूं नकोस. तर मग हें शास्त्र ऐकण्यास योग्य अधिकारी कोण? याचें उत्तर ह्या श्लोकांतच परोक्षतः दिलें आहे ते असें, जो तपी आहे, भक्त आहे, शुश्रूषु आहे आणि भगवन्मत्सररहित आहे, त्याला गीताशास्त्र सांगावें. असा ह्या श्लोकाचा भावार्थ आहे. आतां या श्लोकांतील प्रत्येक पदाचा थोडक्यांत विचार करूं.

भगवंतांनीं प्रस्तुत श्लोकापर्यंत जें कांहीं अर्जुनाला सांगितलें त्याबद्दल 'इदम्' म्ह० 'हें' असा शब्द योजलेला आहे. तेव्हां 'इदम्' म्हणजे 'प्रस्तुत श्लोकाच्या पूर्वींचा सर्व विचार' अर्थात् ज्या विचारास प्रारंभ 'अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे' (गीता २–११) या श्लोकापासून होऊन ज्याचा अंत 'सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज' (गीता १८–६६) ह्या मागील श्लोकांत झालेला आहे, तो सर्व विचार 'इदम्' या शब्दानें लक्षित आहे. या सर्व विचारालाच गीताशास्त्र असे म्हणतात. गीतापुस्तकाचा प्रारंभ 'धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः' या गीतेच्या पहिल्या अध्यायांतील पहिल्या श्लोकापासून होऊन त्या पुस्तकाचा अंत जरी 'यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र

पार्थो धनुर्धरः' या गीतेच्या १८ व्या अध्यायांतील शेवटच्या अशा ७८ व्या श्लोकांत झालेला असला; तरी गीताशास्त्राचा प्रारंभ 'अशोच्यानन्वशोचस्त्वम्', या श्लोकापासून होऊन त्याचा शेवट 'सर्वधर्मान्परित्यज्य' या श्लोकांत झालेला आहे असेंच मानण्यांत येतें. तेव्हां गीताशास्त्राचा उपक्रम 'अशोच्यानन्वशोचस्त्वम्' (गीता २-११) हा आहे व 'इति ते ज्ञानमाख्यातम्' व पुढील तीन श्लोक (गी. १८-६३-६६) हा त्याचा उपसंहार आहे. म्हणून गीताशास्त्राचा उपक्रम व उपसंहार आत्मज्ञानांतच आहे व प्रस्तुत श्लोकांत 'इदं' हा शब्द 'हें ज्ञान म्ह० हें गीताशास्त्र' या अर्थानें योजलेला आहे.

श्रीमच्छंकराचार्यांनीं प्रस्तुत श्लोकास उपन्यास म्हणून आपल्या भाष्यांत पुढीलप्रमाणें लिहिलें आहे—'अस्मिन अध्याये सर्व गीताशास्त्रार्थं उपसंहृत्य, विशेषतः अन्ते च इह शास्त्रार्थदार्ढ्याय संक्षेपतः उपसंहारं कृत्वा, अथ इदानीं शास्त्रसंप्रदायविधिं आह'— म्हणजे-'या अठराव्या अध्यायांत सर्व गीताशास्त्राचा उपसंहार करून आणि विशेषतः शेवटीं 'सर्वधर्मान् परित्यज्य०' या श्लोकांत शास्त्रार्थाचें दृढीकरण करण्याकरितां विषयाचा पुनरपि संक्षेपतः उपसंहार करून आतां यापुढें प्रस्तुत श्लोकांत या गीताशास्त्राचा संप्रदायविधि सांगतात.' तेव्हां श्रीशंकराचार्यांच्या मतें गीताशास्त्राची समाप्ति प्रस्तुत श्लोकाच्या मागील श्लोकांत झालेली असून प्रस्तुत श्लोकांत भगवंत गीताशास्त्राचा संप्रदायविधि म्ह० गुरुशिष्य-परंपरेनें ज्ञान शिकविण्याची पद्धति सांगतात.

ज्ञानेश्वरमहाराजांनींहि प्रस्तुत श्लोकाच्या मागील श्लोकाच्या अंतीं अध्यायसंगति व श्लोकसंगति सांगितलेली आहे. त्यांत त्यांनीं भगवंताला जें कांहीं सांगावयाचे होतें तें सर्व 'सर्वधर्मान् परित्यज्य०' (गीता १८-६६) या श्लोकाच्या अखेर संपलें व प्रस्तुत श्लोकांत भगवंत अर्जुनाला ज्याच्या योगानें प्राप्त झालेली विद्या फलद्रूप होते, तो गीताशास्त्राचा संप्रदाय सांगतात असेंच म्हटलें आहे. ज्ञानेश्वरमहाराज

म्हणतात, "तैसें अर्जुनाचेनि व्याजें। गीता प्रकाशूनि श्रीराजें। संसारायेवढें थोर ओझें। फेडिलें जगाचें॥ म्हणौनि शास्त्रीं जो इये। उचितु संप्रदायो आहे। तो ऐक आतां बहुवें। आदरेंसीं॥" (ज्ञा. १८–१४७०, ८४, ८५).

हा संप्रदाय सांगण्याचें कारण कोणत्याहि गोष्टीचा योग होणें हें एक प्रकारें सोपें असतें. परंतु त्याचा क्षेम होणें फ़ार कठिण असतें. उदाहरणार्थ, पैसा मिळेल, मुलें होतील, परंतु तो पैसा व तीं मुलें आपल्या हयातीपर्यंत टिकतील हें सांगतां येत नाहीं. 'अप्राप्त वस्तूची प्राप्ति' याला 'योग' म्हणतात व 'प्राप्त वस्तूचें रक्षण' याला क्षेम म्हणतात ('अप्राप्तस्य प्राप्तिर्योगः', 'प्राप्तस्य परिपालनं क्षेमः'). तेव्हा या गीताशास्त्राचा क्षेम म्हणजे अभ्युदय अथवा विस्तार होण्याकरिता गीताशास्त्र कोणाला सांगावें, ह्याचाच अर्थ गीताशास्त्राचा अधिकारी कोण आहे, हें भगवंत प्रस्तुत श्लोकांत सांगतात.

पूर्वीची शास्त्रीय परंपरा अशी आहे कीं, ग्रंथ म्हटला कीं, त्याच्या प्रारंभी अथवा शेवटीं 'अनुबंधचतुष्टय' सांगावयाचा. अधिकारी, विषय, प्रयोजन आणि संबंध यांस 'अनुबंधचतुष्टय' म्हणतात. आपल्या मराठी किंवा इंग्रजी भाषेतील प्रत्येक पुस्तकाच्या प्रारंभीं सामान्यतः या अनुबंधचतुष्टयापैकीं पहिल्या तीन गोष्टी पर्यायानें दिलेल्या असतात. उदाहरणार्थ, आपण एखादें एस्. एस्. सी. परीक्षेकरितां नेमलेलें संस्कृतचें पुस्तक घेऊ. त्याच्या प्रस्तावनेंत संस्कृतभाषा हा या पुस्तकाचा विषय आहे, एस्. एस्. सी. परीक्षा देणें हें प्रयोजन व हायस्कूलातील अकराव्या इयत्तेचा विद्यार्थी हा त्याचा अधिकारी होय, इत्यादि सांगितलेलें असतें. ज्याच्या ज्ञानानें वाचक हा ग्रंथाकडे आकर्षिला जातो व त्याचा ग्रंथांत प्रवेश होतो, त्यास 'अनुबंध' म्हणतात.

प्रस्तुत श्लोकांत भगवंत या अनुबंधचतुष्टयापैकीं फक्त गीतेचा अधिकारी कोण तें सांगतात. गीता वाचणारा वेगळा व गीतेचा अधिकारी वेगळा! ज्याला थोडेसें संस्कृत वाचतां येतें किंवा भांडारकरांची दोन पुस्तकें जो शिकला आहे, तो गीता वाचूं शकेल; परंतु तेवढ्यानें तो गीताशास्त्राचा अधिकारी होऊं शकत नाहीं. उदाहरणार्थ, एल्. एस. सी. च्या वर्गांत नांव कोणी घालावें, हा प्रश्न वेगळा व ती परीक्षा पास कोण होईल ही गोष्ट निराळी. एका अगदीं ल्हान मुलाचें नांव दसऱ्याच्या दिवशीं प्रथमतः शाळेंत घालावयाचें होतें. तो मुलगा आपल्या वडिलांना, म्हणाला, "बाबा! तुम्हाला एकंदरींत मला शेवटीं जर 'एम्. ए.' करावयाचें आहे, तर आजच माझें नांव एम्. ए. च्या वर्गांमध्यें कां घालत नाहीं?" नांव घालतां येईल, पण तो मुलगा एम्. ए. कदापी पास होणार नाहीं. तद्वतच गीता ही सामान्यतः कोणालाहि वाचतां येईल, परंतु गीतेचें जें फल आहे, तें प्राप्त होण्याकरितां गीतेचा अधिकारी कसा असावयास पाहिजे ही गोष्ट भगवंत प्रस्तुत श्लोकांत सांगत आहेत. भगवंत हें गीताशास्त्र कोणाला देऊं नये तें सांगतात, पण यांतूनच हें गीताशास्त्र कोणाला सांगावें हें आपोआपच कळतें.

तेव्हां भगवंत प्रस्तुत श्लोकांत गीताशास्त्राध्ययनाचा संप्रदाय सांगतात. सध्यां सांप्रदायिक म्हटला म्हणजे तो एक चेष्टेचा विषय झाला आहे. पण शास्त्रशुद्ध ज्ञान हें संप्रदायाखेरीज प्राप्त होत नाहीं. पारिभाषिक जे शब्द असतात, त्यांचा अर्थ सांगण्याकरितां त्या त्या शास्त्रांतील तज्ज्ञ असावा लागतो. उदाहरणार्थ H2O ह्याचा अर्थ 'पाणी आहे' हें सामान्यांना समजणार नाहीं. तसेंच 'देव पाहों देव पाहों। उंच ठायीं उभें राहों' (तुका–३७०२) हा एक तुकाराम महाराजांचा सुप्रसिद्ध अभंग आहे. त्यांत तुकाराम महाराज 'देव पाहाण्याकरितां चला' असें म्हणतात. कारण रामदासस्वामींच्या शब्दांत सांगावयाचें तर 'जगीं थोरला देव तो चोरलासे' असा आहे. आतां ह्या कडव्यांतील 'उंच ठायीं'

ह्या शब्दांचा काय अर्थ आहे हें नुसता कोश पाहून कळणार नाहीं. कोशांत ' उंच ठायीं ' ह्या शब्दांचा अर्थ ' उंच ठिकाणीं ' असा निघेल व याप्रमाणें वरील कडव्याचा अर्थ ' देव पाहाण्या-करितां उंच ठिकाणीं उभें रहावें ' असा होईल म्हणजे उंच टेकडीवर जाऊन उभें राहिलें असतां अथवा विमानांतून पाहिलें असतां ' देव दिसतो ' असा ह्या कडव्याचा अर्थ होईल. खरें सांगावयाचें तर संप्रदायांत गेल्याखेरीज ही ' उंची ' कळणार नाहीं. ज्यांनी तुकारामबुवांच्या गाथ्याचा सांप्रदायिकरीत्या अभ्यास केलेला आहे असें सांप्रदायिकच ' उंच ठायीं ' हे शब्द कोणत्या अर्थानें योजलेले आहेत हें सांगूं शकतील. आणखी एक उदाहरण द्यावयाचें तर ' तिन्ही अवस्थांचेनि द्वारें । उपाध्युपहिता-कारें । भावाभावरूप स्फुरे । दृश्य जें हें ॥ ' ( ज्ञा. १८–११८६ ) या ओवीचा अर्थ आज अत्युच्च शिक्षण घेतलेल्या मराठी वाचकालाहि केवळ स्वतः वाचून अथवा कोश पाहून समजणार नाहीं. या ओवीतील ' भाव ' ह्या शब्दाचा अर्थ ' तंबाखूचा भाव ' किंवा ' गठडीचा भाव ' असा नाहीं. हा ' भाव व अभाव ' काय आहे, हें सांप्रदायिकच सांगूं शकेल. संप्रदायाचें महत्त्व सांगतांना ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात कीं, ' श्रीगुरु प्रसन्न झाले, शिष्यहि विद्यासंपन्न झाला, परंतु ती विद्या संप्रदाय नीट पाळला तरच फळाला येते. ' ( ' तैसा श्रीगुरू प्रसन्नु होये । शिष्य विद्याहि कीर लाहे । परी ते फळे संप्रदायें । उपासिलिया ॥ ' ज्ञा. १८–१४८४ ). गाईचें दूध पाहिजे असेल तर शेपटीच्या खालीं लागून दूध मिळणार नाहीं. तद्वतच प्राप्त झालेल्या विद्येचा योग्य विस्तार व्हावा असें वाटत असेल तर ह्या विद्येचा प्रसार सांप्रदायिकरीत्याच करावा लागतो. प्रस्तुत श्लोकामध्यें भगवंत गीताशास्त्राध्ययनाचा संप्रदाय फार गोड सांगतात. ते म्हणतात, " अर्जुना ! हें गीताशास्त्र तूं ज्याला सांगशील, त्याच्या ठिकाणीं पहिला गुण जर कोणचा असावयास पाहिजे असेल, तर तो ' तपी '

पाहिजे. अतपस्व्याला तूं गीताशास्त्र सांगूं नकोस. " ('इदं ते अतपस्काय न वाच्यम्' ).

वास्तविक गीता ही रणांगणावर सांगितलेली असल्यामुळें ती ऐकावयास तपाची काय जरुरी आहे? असें वाटण्याचा संभव आहे. फार तर ज्याचे दंड पीळदार व भरीव आहेत, जो चांगला तरुण, ताठ व जवान आहे त्यालाच ती सांगावी! तसेंच गीता सांगणारा हा कांहीं 'अंगं गलितं पलितं मुंडं दशनविहिनं जातं तुंडम्' अशा प्रकारचा वृद्ध गृहस्थ नाहीं. गीता ऐकणारा हाहि पेन्शनर किंवा विगतधवा या वर्गांतील नाही व गीता जेथें सांगितली तें स्थळ एखादा मठ किंवा शिवालयहि नाहीं. गीता ही योगयोगेश्वर व सर्व जगताचा नियामक अशा भगवान् श्रीकृष्णांनीं सांगितली ('गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।' गीता ९-१८). अर्जुन जो महान् योद्धा त्यानें ती ऐकली व भारतीयुद्धप्रसंगीं ती रणांगणावर सांगितली गेली ('अहो संग्रामु हा वाणिया । मापें नाराचांचिया आणिया । सूनि मांस घे मवाणिया । जीवितेंसी ॥ ऐसिया समयीं कर्कशे । भोगीजत स्वानंदराज्य कैसें । आजि भाग्योदयो हा नसे । आणिके ठाई ॥' ज्ञा. १७-४२५-२६ ). अशी जरी वस्तुस्थिति असली तरी गीतेचा विषय लढाई नाहीं. भगवंतांनीं अर्जुनाला गीतेंत ठिकठिकाणीं जरी 'तूं युद्धाला उभा राहा; यश संपादन कर, शत्रूंना जिंक' वगैरे सांगितलेलें असलें ('तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून् भुङ्क्ष्व राज्यं समृद्धम् ॥' गीता ११-३३; 'ततो युद्धाय युज्यस्व' गीता २-३८; युद्ध्यस्व विगतज्वरः ॥ ' गीता ३-३० ) तरी गीता हें रणशास्त्र नव्हें. म्हणजे गीतेंत कशानें लढावें, कोणतीं शस्त्रास्त्रें वापरावीत, तीं कशीं निर्माण करावींत, रणसाहित्यांत कोणत्या आयुधांचा अंतर्भाव असावा, इत्यादिकांची चर्चा तींत नाहीं. गीतेचा विषय अध्यात्म आहे ('तैसें अध्यात्मशास्त्रीं इये । अंतरंगचि अधिकारिये ।' ज्ञा. १८-१७४९ ) व म्हणूनच गीतेचा अधिकारी तपी सांगितला आहे.

गीता हें लढाईचें शास्त्र नसून तें अध्यात्मप्रधान नीतिशास्त्र आहे ही गोष्ट गीतेंतील अर्जुनाचा मूळ प्रश्न व त्यास भगवतांनीं दिलेलें उत्तर यांचा जर विचार केला तर त्यावरून उघड होणारी आहे. स्वजनांचा व गुरुजनांचा वध करून राज्यसुख भोगणें हे 'धर्म्य' आहे, किंवा युद्ध टाळून भिक्षेवर निर्वाह करणें हे 'धर्म्य' आहे, यासंबंधीं अर्जुनाचें मन गोंधळून गेलें होतें. अर्जुन हा कांहीं अज्ञ किंवा मंदबुद्धीचा नव्हता. त्याच्या मनगटांत बळ होतें व युद्धांत आपण भीष्मद्रोणादिकांना जिंकूं, असा त्याच्या ठिकाणी आत्मविश्वासहि होता. युद्ध हे धर्म्य आहे असें बुद्धीनें ठरवूनच तो रणांगणावर युद्ध करण्याकरितां म्हणून आला होता. परंतु आपल्यासमोर उभे राहिलेले आपले गोत्रज व भीष्मद्रोणादिक गुरुजन पाहून त्यांच्याशीं लढणें हे योग्य नव्हें असें त्याला वाटूं लागलें. त्याच्या शरीराला जरी पृथेनें जन्म दिला असला तरी धनुर्धर म्हणून आपली जी ख्याति आहे, त्यास कारण केवळ द्रोणाचार्यच असल्यामुळें त्यांचा वध करणें हें अनुचित आहे, असें त्याला वाटूं लागलें. तो भगवंताला म्हणतो, 'मी पार्थु द्रोणाचा केला। येणें धनुर्वेद मज दिधला। तेणें उपकारें काय आभारैला। वधी तयातें॥' (ज्ञा. २–३७) तेव्हां युद्ध करणें उचित आहे, का घरीं परत जाणें उचित आहे, यासंबंधीचा व्यामोह अर्जुनाचे ठिकाणी उत्पन्न झाला व या दोहोंत श्रेय कोणतें, तें मला सांगा. असा अर्जुनाचा मूळचा प्रश्न आहे ('कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः। यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्॥' गीता २–७). तो भगवंताला स्पष्ट म्हणतो कीं, "देवा! याला युद्ध तरी कसें म्हणतां येईल? माझ्या मतें हा केवळ पूज्यांचा उच्छेद आहे!" ('हें झुंज नव्हें प्रमादु। एथ प्रवर्तलिया दिसतसे बाधु। हा उघडा लिंगभेदु। वोढवला आम्हां॥' ज्ञा. २–३१). तेव्हां अर्जुन म्हणतो 'हें युद्ध आहे का?' याचें मर्म समजण्याकरितां एक उदाहरण देण्यासारखे आहे, तें असें—

एकदां एका मालकानें आपल्या नोकरास बाजारांतून आठ आण्याचे चांगले पेढे विकत घेऊन ये, म्हणून सांगितलें. तो बाजारांत गेला आणि त्यानें एका दुकानांतून आठ आण्यास तीन पेढे विकत घेतले व तो घरीं परत येण्यास निघाला. परत येतांना त्याच्या डोक्यांत अशी कल्पना आली कीं, आपण पेढे विकत घेण्यापूर्वी तें चांगले आहेत किंवा नाहींत हें चाखून पाहिलें नाहीं. तेव्हां या तीन पेढ्यांपैकीं एक पेढा चाखून पाहणें अवश्य आहे. असा विचार करून त्यानें एक पेढा तोंडांत टाकला व तो त्याला चांगला वाटला. कांहीं मार्ग चालून गेल्यानंतर त्याच्या डोक्यांत दुसरी कल्पना आली. आपण घरीं गेल्यानंतर आपला मालक या पेढ्यांपैकीं निदान एक पेढा तरी आपणांस खावयास देणारच, तेव्हां तो आतांच जर आपण खाल्ला तर निदान रस्त्यानें जातांना आपल्याला चांगली करमणूक तरी होईल, असें वाटून त्यानें दुसरा पेढाहि तोंडांत टाकला. घरीं गेल्यानंतर त्यानें मालकाच्या पुढें एकच पेढा ठेवला, हें पाहून मालकानें विचारलें, "अरे! आठ आण्यास एकच पेढा कसा मिळाला?" त्यावर तो नोकर म्हणाला, "मी आठ आण्यांस तीन पेढे खरेदी केले. पेढे कसें काय आहेत, हें पाहण्याकरितां म्हणून मी त्यांतील एक पेढा तोंडांत टाकला. दुसरा तुम्ही घरीं आल्यानंतर मला दिलाच असता म्हणून तोहि मी वाटेंतच खाल्ला व उरलेला तिसरा पेढा तुमच्याकरितां ठेवलेला आहे." यावर मालकानें त्याला दरडावून विचारलें कीं, 'तूं पेढे कसे खाल्लेस?' त्याबरोबर त्यानें 'असे खाल्ले' म्हणून तिसराहि पेढा तोंडांत टाकला! वास्तविक 'तूं पेढे कसें खाल्लेस?' हें विचारण्यांत मालकाचा हेतु, तें पेढे त्यानें दांत न लावतां खाल्ले का चावून खाल्ले असा नसून, ते पेढे त्याला मालकाच्या परवानगीशिवाय खाववले तरी कसे, असा होता. तद्वतच अर्जुन भगवंताला म्हणतो, "देवा! हे समोर कोण आहेत, त्यांना तूं जाणत नाहींस काय? ज्यांचे आमच्यावर असाधारण उपकार आहेत, तेच हे प्रत्यक्ष भीष्म व द्रोण समोर उभे आहेत ("हे नेणसी तूं कवण।

परी पैल भीष्म द्रोण। जयांचे उपकार असाधारण। आम्हां बहुत॥' ज्ञा. १–२२२ ), मग त्यांच्याशीं लढावें तरी कसें ? त्यांना मारावें असें वाणीनें नुसतें बोलणें, हेंच पाप आहे, आणि अशा स्थितींत ज़र आम्हीं त्यांना प्रत्यक्ष मारलें तर मग आमच्याविषयीं कोणास आदर वाटेल ? व तूं आम्हाला अंतरशील" ('जरी आजि एथ ऐसें कीजे। तरी कवणाच्या मनीं उरिजे। सांगें मुख केवीं पाहिजे। तुझें कृष्णा॥' ज्ञा. १–२२७ ) तात्पर्य, अर्जुनाचा मूळचा प्रश्न गुरुजनांचा वध करून युद्ध करणें धर्म्य आहे, का शस्त्रसंन्यास करणें योग्य आहे, असा धर्मविषयक अथवा नीतीविषयक किंवा कर्तव्याकर्तव्यविषयक होता.

भगवंतांनीं अर्जुनाच्या प्रश्नाचें उत्तर 'अर्जुना, तूं क्षत्रिय आहेस, लढणें हें तुझें कर्तव्य आहे व म्हणून तूं लढ' एवढेंच सुजवी न देतां, अर्जुनाला अशाप्रकारचा व्यामोह पुन्हां उत्पन्न होऊंच नये, एवढ्याकरितां अध्यात्मज्ञानांत जाऊन आणि जीवाचें व जगताचें खरें स्वरूप काय इत्यादि सांगून त्यांनीं त्याच्या प्रश्नाचें उत्तर तर्क, युक्ति व ज्ञान यांचा अंगीकार करून दिलें आहे. यामुळेंच गीता हें शास्त्र झालें आहे. अर्जुन प्रश्न विचारतो, "देवा ! मी लढूं का नको ?' त्यावर भगवंत एकदम म्हणतात, 'अशोच्यानन्वशोचस्त्वम्,' 'नत्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः' (गीता २-११-१२) इत्यादि. ह्याचाच अर्थ गीता हें अध्यात्मप्रधान नीतिशास्त्र आहे. तेव्हां गीतेंतील मुख्य विषय 'लढाई' नसून 'अध्यात्म अथवा आत्मा' आहे व हीच गोष्ट भगवंतांनीं गीतेंत ठिकठिकाणीं सांगितली आहे. भगवंत म्हणतात, 'इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ' (गीता १५–२०); 'इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया' (गीता १८–६३) इत्यादि. ज्ञानेश्वरमहाराजहि म्हणतात कीं, 'गीतेचा मुख्य विषय अविद्येचा निरास करणें व तद्द्वारां मोक्ष मिळविणें हा आहे आणि या दोहोंस साधन असणारें जें आत्मज्ञान तेंच भगवंतांनीं गीतेंत नानाप्रकारांनीं सांगितलें आहे.

( ' एथ अविद्यानाशु हें स्थळ । तेणें मोक्षोपादान फळ । या दोहीं केवळ । साधन ज्ञान ॥ हें इतुलेंचि नानापरी । निरूपिलें ग्रंथविस्तारी । ' ज्ञा. १८-१२४३-४४). भगवंतांनीं अर्जुनाला गीतेंत जो कर्माकर्माचा विचार सांगितलेला आहे तोहि अध्यात्मज्ञानाच्या भूमिकेवरूनच सांगितलेला आहे ( ' तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर। असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ ' ३-१९), व गीतेचा भर ' अमुक कर ' यापेक्षां ' तू आत्मवान हो ' आणि मग कर्तव्यकर्म कर यावरच अधिक आहे ( ' त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन। निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान। ' गीता २ ४५ ).

तेव्हा गीता हा अध्यात्मज्ञानाचा–आत्मानात्मविवेकाचा ग्रंथ आहे ( ' आधींचि विवेकाची गोठी। ' ज्ञा. ४–२). विवेक वेगळा व विचार वेगळा. लोकात विचार आहे परंतु तो स्वार्थ-प्रेरित आहे. काहीं लोक म्हणतात कीं, खोटें बोलल्याखेरीज होणारच नाहीं व वकिली धंदा असा आहे कीं, त्यात खोटें बोलावे लागतेंच. परंतु खोटे बोललें तर धंदा चालेल पण देव मिळणार नाहीं ! तेव्हा व्यापारात अथवा प्रपंचात विचार आहे. पण विवेक ह्याचा अर्थ ' वेगळीक करणें, निवड करणें ' असा आहे. या जगतात सत्य म्ह० शाश्वत वस्तु कोणती व असत्य म्ह० अशाश्वत वस्तु कोणती, याची जी निवड तिलाच वेदान्त-शास्त्रामध्यें ' विवेक ' म्ह० आत्मानात्मविवेक म्हणतात. ' नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ॥ ' ( गीता २–१६ ) हा जो अबाधित सिद्धान्त तो गीतेंतील ' विवेक ' आहे. या सर्व चराचर सृष्टिरूपी उपाधीमध्यें चर्मचक्षूंना न दिसणारे परंतु सर्वांच्या बुडाशीं असणारें जें आत्मतत्त्व त्याचा स्वीकार ज्ञानी पुरुष कसा करतात, या बाबतींत ज्ञानेश्वरमहाराजांनीं एक सुंदर दृष्टान्त दिला आहे. राजहंस पक्षी दूध आणि पाणी एकत्र मिश्रित करून त्याच्यापुढे ठेवलें असता, तो आपल्या चोचीनें त्यातील नेमकें दूध तेवढे काढून घेतो; तद्वतच संत हे राजहंसाप्रमाणें

उपाधीरूपी म्हणजेच अनात्मपदार्थरूपी पाणी टाकून, आत्मरसरूपी दूध सेवन करतात (' आणि अनात्मवर्गनीर। सांडूनि आत्मरसाचें क्षीर। चरताति जे सविचार। राजहंस ॥' ज्ञा. १५-२९६). तात्पर्य, गीता हा आत्मानात्मविवेकाचा ग्रंथ असल्यामुळें जे 'सोहंभावानें पारंगत' आहेत तेच यात रममाण होऊं शकतात (' सोहंभावें पारंगतीं। रमिजे येथ॥' ज्ञा. १-५३). वाचणें वेगळें व रममाण होणे वेगळें. रममाण होण्याकरिता तद्तद् विषयांतील अधिकारी लागत असतो. उदाहरणार्थ, लोक गाणें ऐकतात, परंतु सर्वांनाच तें समजतें असें मुळींच नाहीं. या बाबतींत मी एक गोष्ट सांगत असतों, ती अशी–

पुरातन काळीं एकदा एका बादशहानें शिमग्याच्या सणात एक गाण्याची मैफल भरवली. गाणें ऐकावयास लोकांची खूपच गर्दी लोटली होती व त्यातील पुष्कळ लोक गाणें ऐकत असताना वारंवार ' अच्छा, अच्छा ! ' असें म्हणत होते. हें पाहून बादशहाला फार आनंद झाला व त्यानें बिरबलला विचारलें, " बिरबल ! आपल्या राज्यांत गाणें जाणणारीं पुष्कळ माणसें दिसतात, कारण येथें जमलेले बहुतेक लोक ' अच्छा, अच्छा ' असें करीत आहेत. तेव्हा ही मोठी अभिमानाची गोष्ट आहे." त्यावर बिरबल म्हणाला, " हुजूर ! खरें सांगावयाचें तर, या सर्व जमावात गाणें जाणून त्यात रममाण होणारीं अशीं अवघीं पाचदहा माणसें तरी निघतील का नाहीं, या बाबतींत मला शंकाच आहे !" बादशहाला हें पटेना. तेव्हा बिरबल म्हणाला, " हुजूर ! हातच्या काकणाला आरसा कशाला? मी जें सांगतों त्याचा प्रत्यय आपणास आताच आणून देतों." नंतर गाण्यातील जेव्हा मधला चहा-कॉफीचा प्रसंग संपला व पुन्हा गाणें सुरू झालें तेव्हा बिरबलनें असें फर्मान जाहीर केलें कीं, जे कोणी गाणें चालू असता ' अच्छा ' म्हणतील त्यांना सहा महिन्याची कैद भोगावी लागेल! मग जिकडेतिकडे शांत वातावरण झालें, कारण ' अच्छा ' म्हटलें कीं, घरीं परत जाण्याची आशाच नको, एकदम तुरुंगवास ! कांहीं

काळ गेल्यानंतर गवई गाणें म्हणतां म्हणतां जेव्हां समेवर आला, तेव्हां त्या सर्व जमावापैकीं तिघांनीं 'अच्छा' म्हटलेंच. मग बिरबलानें बादशहास सांगितलें, "हुजूर! या येथें जमलेल्या सर्व लोकात हे तिघे तेवढेच गाणें जाणून त्यात रममाण होणारे आहेत, बाकी सर्व नुसते शालिग्राम आहेत." सांगण्याचा आशय असा कीं, वाचणें अथवा ऐकणें वेगळें व त्यात रममाण होणें वेगळें.

तद्वतच गीता हा असामान्य ग्रंथ आहे. कारण वेदाच्या प्रतिपादनाची जी मुख्य देवता, तोच भगवान् श्रीकृष्ण या ग्रंथांतील वक्ता आहे ('बाप बाप ग्रंथ गीता। जो वेदीं प्रतिपाद्य देवता। तो श्रीकृष्ण वक्ता। जिये ग्रंथीं॥' ज्ञा. ११–२६). बरें, गीतेंतील विषय तरी कोणता आहे? तर य सर्व उपाधींत न चलणारें, न हलणारें असें साक्षात् जें ब्रह्म तेंचा या ग्रंथाचा विषय आहे ('उपद्रष्टाऽनुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः। परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः॥' गीता १६–२२, 'प्रकृति होत जाये। हा तो असतुचि आहे। म्हणोनि आब्रह्माचें होये। शासस हा॥' ज्ञा. १३–१०२३). म्हणजे जो विषय प्रतिपादन केलेला आहे. तोच सांगणारा आहे, कारण श्रीकृष्ण हे साक्षात् परब्रह्मच होत ('ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहम्' गीता १४–२७). वास्तविक जी करंजी पानात वाढावयाची तीच बोलू लागली असा हा गीताख्य प्रसंग आहे. गीता ग्रंथात प्रतिपादक व प्रतिपाद्य दोन्ही एकच आहेत. ('जो इये शास्त्रीं येकु श्रीकृष्णचि वाच्य वाचकु। हें प्रसिद्ध जाणे लोकु। भलताहि॥' ज्ञा. १८–१६८२) बरें! ऐकणारा अर्जुन हाहि साक्षात् परमेश्वराचाच अवतार होय. 'तो नर तैसा नारायण' ज्ञा. १३–११४५, असें ज्ञानेश्वरमहाराजांनीं त्याचे बाबतींत म्हटलें आहे ('वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पांडवानां धनंजयः॥' गीता १०–३७). तात्पर्य, गीतेच्या बाबतींत व्याख्याता (म्ह० वाचक) विषय (म्ह० वाच्य) व श्रोता हे सर्व परमात्माच आहे म्हणून

ज्ञानेश्वरमहाराजांनीं गीता 'हें केवळ सगळें परब्रह्मच आहे.' असें म्हटलें आहे ('शास्त्र वाच्यें अर्थें फळे । मग आपण मावळे । तैसें नव्हे हें सगळें । परब्रह्मचि ॥' ज्ञा. १८–१६८५). तात्पर्य, गीता हा असा अपूर्व ग्रंथ आहे व शास्त्रदृष्ट्या त्याची समाप्ति गीतेच्या १५ व्या अध्यायाच्या अखेर झाली आहे. ('इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ।' गीता १५–२०, 'तरी अध्यायीं पंधरावां । श्रीकृष्णें तया पांडवा । शास्त्रसिद्धांतु आघवा । उगाणिला ॥' ज्ञा. १६–४१).

ज्ञानेश्वरमहाराजांनीं १६ व्या अध्यायाच्या प्रारंभींच आतां 'निरूप्य' (म्ह. सांगण्यासारखे) असें कांहींच राहिलें नाहीं असें म्हटलें आहे. मग गीता पुन्हां का सुरू झाली ह्याला कारण केवळ 'गुरु-शिष्यांचा स्नेहसंबंध' (म्हणौनि इथे अध्यायी । निरूप्य नुरेचि कांहीं । आतां गुरु-शिष्यां दोहीं । स्नेहो लाहणा ॥ ज्ञा. १६–४६). तसेंच गीतेच्या १८ व्या अध्यायाचा निर्मितीला कारण भगवान् श्रीकृष्ण व अर्जुन यांच्यातील एकनिष्ठ प्रेमच होय, असेंहि ज्ञानेश्वरमहाराजांनीं सांगितलें आहे. गीतेच्या १७ व्या अध्यायाच्या शेवटीं भगवंत स्वस्थ बसलेले अर्जुनाला पाहवेना व याकरितां 'त्याग व संन्यास' यासंबंधींच्या प्रश्नाचें निमित्त करून अर्जुनानें भगवंताला गीतावस्त्राची घातलेली घडी पुन्हां उलगडावयास लावली. म्हणजे भगवंताला पुन्हां त्यानें गीता सांगावयास लावली. तेव्हां गीतेचा अठरावा अध्याय ही एकाध्यायी गीताच आहे ('एऱ्हवीं तत्त्वविषयीं भला । तो निश्चितु असे कीर जाहला । परी देवो राहे उगला । तें साहावेना ॥ ऐसी प्रेमाची हे जाती । आणि पार्थ तंव तेचि मूर्ती । म्हणूनि करूं लाहे खंती । उगेपणाची ॥ यालागीं त्याग संन्यास । पुसावयाचें घेऊनि मिस । मग उपलविलें दुस । गीतेचें तें ॥ अठरावा अध्यावो नोहे । हे एकाध्यायी गीताची आहे । जैं वांसरूंचि गाय दुहे । तैं वेळु कायसा ॥' ज्ञा. १८–७७, ८०, ८३, ८४). या एकाध्यायी गीतेचा शास्त्रदृष्ट्या उपसंहार प्रस्तुत प्रवचनाच्या श्लोकाच्या मागील

श्लोकात म्ह. 'सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज' ( गीता १८-६६ ) यात झालेला आहे. या श्लोकांत भगवंतांनीं जी शरणागति सांगितलेली आहे. ती वस्तुतंत्र शरणागति आहे, व ही शरणागति केवळ ज्ञानाच्या अंगानेंच होत असते. देहतादात्म्य टाकून म्हणजे जीवनपणा टाकून, 'मी ब्रह्म आहें' असें साक्षात्कार रूप ज्ञान प्राप्त करून घेऊन, परमात्मवस्तूशी ज्ञानाच्या अंगानें समरस होऊन जाणें, यालाच वस्तुतंत्र शरणागति म्हणतात ( 'पै आपुलेनि भेदेंविण । माझें जाणिजे जें एकपण । तयाचि नांव शरण । मज येणें गा ॥' ज्ञा. १८-१३९८ ). तेव्हां गीतेचा विषय आत्मा आहे व तो नुसता बोलण्यानें प्राप्त होणारा नाहीं, तर तो स्वतः आपण अनुभवाच्या अंगानें व्हावयाचा आहे. जसा विषय तसा त्याचा अधिकारी लागत असतो. श्रुतीनेंहि आत्मप्राप्तीचा उपाय तप हाच सांगितला आहे ( 'सत्येन लभ्यस्तपसा ह्येष आत्मा सम्यग्ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम् ॥' मुण्डाकोपनिषत् ३—१—५ ). भगवंतहि प्रस्तुत श्लोकांत गीतेचा अधिकारी तपीच सांगतात ( 'इदं ते नातपस्काय' )

वास्तविक आत्मसुख हा सर्व मानवजातीच्या इच्छेचा विषय असल्यामुळें अध्यात्मशास्त्राचा अधिकार सर्व मानवांना आहे. कर्माचे बाबतींत तसें नाहीं. उदाहरणार्थ, ज्याला स्वर्गाची इच्छा असेल त्यालाच 'ज्योतिष्टोम' नांवाचें यज्ञसाधन उपयोगी आहे, इतरांना नाहीं. परंतु दुःखसंबंधरहित निरतिशय असें शाश्वत सुख म्हणजे आत्मसुख प्रत्येकाला अपेक्षणीय असल्यामुळें अध्यात्म-शास्त्राचा म्हणजेच पर्यायानें गीताशास्त्राचा अधिकार सर्व मानवांना आहे. तो विशिष्ट आश्रमास व विशिष्ट वर्णास आहे असें नाहीं. तरीपण अध्यात्मशास्त्रज्ञान फलद्रुप होण्याकरितां विशिष्ठ पूर्वसामुग्री लागत असते. तद्धिरहित वेदान्तशास्त्राचें नुसतें श्रवण, वाचन व प्रवचन करीत राहिलें तरी त्यानें काम होत नाहीं. उलट अधिकारावांचून वेदांताचें अवलोकन केलें तर त्याचें पर्यवसान शुद्ध स्वैरवर्तन आणि पाषांड ह्यांत होण्याचा संभव असतो. तेव्हां

अध्यात्मशास्त्राचा अधिकार प्राप्त होण्यास साधनसंपत्ति लागत असते. ती साधनसंपत्ति म्हणजे १. नित्यानित्यवस्तु विवेक, २. इहामुत्रफलभोग विराग, ३. शमादि षट्क आणि ४. मुमुक्षुता. यांतील पहिलीं तीन ज्याच्या ठिकाणीं असतात त्यालाच तपी म्हणावें व तोच गीताशास्त्राचा अधिकारी आहे.

सामान्यतः लोक नुसतें गीतेचें श्रवण करतात किंवा त्यावर प्रवचनें देतात. परंतु तेवढ्यानें त्यांना आत्मानुभवाची प्राप्ति होत नाहीं. अर्जुनाला भगवंतांनीं गीता सांगितली ह्याचें एक कारण असें कीं, तो जें ऐके त्याप्रमाणें तें तो आचरणांत आणीत असे (' अर्जुना तूं परिससी । परिसोनि अनुष्ठिसी । तरी आम्हांसीचि वानी कांयसी । सांगावयाची ॥ ' ज्ञा. ५–१६९ ). नाहींतर परमार्थ ऐकणारे पुष्कळ लोक असतात, परंतु त्याप्रमाणें आचरण करणारा एखाददुसराच असतो. नुसत्या श्रवणाचा फारसा उपयोग होत नाहीं. एका गृहस्थानें मला विचारलें की, ' सोनोपंत ! देवानें जीं आपणांस इंद्रियें दिलेलीं आहेत, त्यापैकीं कानाची तेवढीच रचना विशिष्ट प्रकारची का केली आहे ? एका कानाच्या बरोबर विरुद्ध दिशेला दुसरा कान अशीच ती ठेवण का आहे ? ' मीं सांगितलें कीं, ' ज्ञानेश्वरींत यासंबंधीं कांहींहि लिहिलेलें नाहीं. ' त्यावर तो म्हणाला, " मला असें वाटतें कीं, ' नळी फुंकिली सोनारें, इकडून तिकडे गेले वारे ' या म्हणीनुसार एका कानानें ऐकलेलें दुसऱ्या कानानें तें लगेच बाहेर पडावें, एवढ्याकरितां ही विशिष्ट रचना केलेली असावी. " सारांश असा कीं अशा श्रवणाचा कांहींहि उपयोग होत नाहीं. तुकाराममहाराज म्हणतात, ' ऐकावी म्हूण कथा । राहें तैसें धरूनि चित्ता ॥ ' ( तुका० ३५४२ ). जें श्रवण केलेलें असेल त्याचें अभ्यासपूर्वक मनन व तदनुसार आचरण केलें तरच त्याचा अनुभव येत असतो. तोंडानें कितीहि जरी वेदान्त सांगत असला, परंतु अंतःकरणांत जर विषयवासना असतील तर त्याला माझी प्राप्ति निश्चयेंकरून होत नाहीं असें भगवंत त्रिवार सांगतात (' पैं तोंड भरो का विचारा

दे आणि अंतःकरणीं विषयांसी थारा। तरी नातुडें धनुर्धरा। त्रिशुद्धी मी ॥' ज्ञा० १५–३९३ ).

लिलांव करणारे जे लोक असतात त्यांची माल विकायाची एक विशिष्ट पद्धत असते. सर्वांत जास्त किंमत बोलणारास ते माल विकीत असतात. उदाहरणार्थ, एखादें धोतराचें पान विकावयाचें असेल तर तें हातांत घेऊन प्रथमतः त्याची कांहीं तरी किंमत लिलाव करणारा तोंडानें पुकारतो. तो ओरडत असतो, 'चार रुपये पांच आणे एकवार' इत्यादि. नंतर तेथें जमलेले जे लोक असतात त्यांपैकीं एखादा किंमत चढवतो व म्हणतो, 'चार रुपये बारा आणे.' नंतर तो पुन्हा चढवलेली किंमत पुकारतो व म्हणतो, 'चार रुपये बारा आणे एकवार'. अशी किंमत चढतां चढतां त्याच्या मनासारखी किंमत आली कीं तो पुकारतो, 'अमुक किंमत दोनवार'. त्यावर कोणी किंमत आणखी वाढवली नाहीं म्हणजे तो सरतेशेवटीं 'तीच किंमत तीनवार' म्हणून पुकारतो व ज्यानें ती किंमत सर्वांत अधिक चढविलेली असते त्याला तो तें धोतराचें पान विकतो. 'तीनवार' म्हटल्यानंतर जर एखादा गृहस्थ अधिक किंमत देऊं लागला तर मग तो तें पान त्याला देत नाहीं. 'तीनवार' हा शब्द ती किंमत निश्चयेकरून मुक्रर झाली हें दर्शविण्याकरितां योजीत असतात. तद्वतच भगवंत् 'मी त्रिशुद्धी नातुडें' असें म्हणण्यांत 'त्रिशुद्धि' या शब्दानें सांगतात कीं, अर्जुना भला मोठा पंडित असेल, तोंडानें अद्वैत वेदान्त सुंदर सांगत असेल, परंतु अंतःकरण जर विषयांनीं व्याप्त असेल, मलादि दोष असतील तर त्याला मी 'त्रिशुद्धी म्ह० त्रिवार प्रतिज्ञापूर्वक' सांपडणार नाहीं. त्याचप्रमाणें जो नास्तिक, निंदक अथवा दुर्जन आहे त्यालाहि आत्मदर्शन होणार नाहीं ('नास्तिक निंदक दुर्जन। ज्ञानगर्वी विकल्पी जन। त्यांचे अंगीं देहाभिमान। त्यासी आत्मदर्शन कदा न घडे ॥' हस्तामलक २७३ ). आत्मदर्शन त्यालाच होईल कीं ज्याचें मन शुद्ध आहे.

पूर्वी आपल्याकडे लोखंडाचे आरसे असत. लोखंड घासून घासून इतके स्वच्छ करीत कीं, त्यांत मनुष्याचे प्रतिबिंब दिसे. एकदां एक गृहस्थ बाहेर जावयास निघाला असतां त्यानें त्याच्या नोकराला आरसा आणावयास सांगितला. त्यानें इकडे तिकडे पाहिलें, परंतु त्याला आरसा सांपडेना. मग त्यानें मनांत विचार केला कीं तवाहि लोखंडाचा व आरसाहि लोखंडाचा व दोघांचा आकारहि जवळ जवळ सारखाच आहे; तेव्हा आरशाच्या ऐवजीं तवा नेऊन देण्यास हरकत नाहीं, म्हणून त्यानें मालकास तवा आणून दिला. परंतु आरसा आणि तवा हे जरी दोन्ही लोखंडाचेच असले तरी आरसा ही शुद्ध उपाधि आणि तवा हातात घेतला तर त्याची काजळी मात्र हाताला लागेल व त्यामुळें हाताला डाग पडेल पण त्यात तोंड कधींच दिसणार नाहीं ( ' एकी जाति तव्याआरशासी । आरिसा उपलब्धि तवा मसी । तेवी चित्तशुद्धि परमार्थासी । विकल्पवंतासी अभावो ॥ ' हस्तामलक २७५ ). तद्वतच आत्मदर्शन ज्या मनाला होतें तें मन शुद्ध असावें व मनाची शुद्धि ही तपानें होत असते. एवढ्याकरिता गीतेचा अधिकारी हा तपी सांगितला आहे.

इंद्रियनिग्रह, शीतोष्णादि द्वंद्वें सहन करणें व मित आहार घेणें यास सामान्यतः ' तप ' म्हणतात. तपाचे तामस, राजस व सात्विक असे तीन प्रकार आहेत. दुसऱ्याचा उच्छेद करणें, अशासारख्या तामसी हेतूनें केलेलें जें तप तें ' तामस तप ' होय. सत्कार–मान–पूजार्थ यासाठीं केलेलें तप तें ' राजस तप ' होय. दंभार्थ नसलेलें व कोणत्याहि प्रकारची व्यावहारिक फलाकांक्षा न ठेवतां केवळ ईश्वरप्राप्तीसाठीं केलेले जें तप, तें सात्विक तप ' होय. परमार्थात सात्विक तपाची जरूरी असते. या सात्विक तपाचे पुन्हा शारीरिक अथवा बहिरंग तप व ज्ञानमय अथवा अंतरंग तप असे दोन विभाग आहेत.

शारीरिक तप हें देहाची आटणी करण्याकरिता व तद्द्वारा देहतादात्म्य नष्ट करण्याकरितां करावयाचें असतें. आपलें शरीराशीं

तादात्म्य इतकें घट्ट झालेलें असतें कीं, त्यांत आपला आत्मभाव लुप्त झालेला असतो. दिवसाच्या २४ तासांत आपण एक क्षणभरहि आपल्याला देहापासून वेगळें समजत नाहीं. मी पूर्वी इतका लठ्ठ होतों आतां बारीक झालों आहे, माझ्यासारखा बुद्धिवान नाहीं इत्यादि आपले सर्व व्यवहार शरीराशी व इंद्रियांशीं तादात्म्य करून चाललेले असतात. उपवास करून जर वजन वाढत असेल तर त्याचा कांहींहि उपयोग नाहीं. एकादशीस फराळास कोणते नवीन पदार्थ करावयाचे याची चर्चा करीत बसणें व्यर्थ आहे. रोज यथेच्छ जेवणाऱ्याच्या कामवासना बलवत्तर झाल्याखेरीज राहणार नाहींत. शरीराची आटणी होण्याकरिता साधकानें किती मित आहार करावा ही गोष्ट ज्ञानेश्वरमहाराजांनीं ' विविक्तसेवी लघ्वाशी ' ( गीता १८–५२ ) या श्लोकावरील आपल्या टीकेंत फार सुंदर रीतीनें सांगितली आहे. ते म्हणतात, ' भोजन करतांना साधकानें ( १ ) शरीराचें बळ वाढावें, ( २ ) भूक संपूर्णतः नष्ट व्हावी व ( ३ ) जिभेचे कोड पुरवावे, ह्या तीन गोष्टी लक्षात न घेतां केवळ प्राणाचें पोषण होईल एवढ्याच वेतानें थोडेसें अन्न सेवन करावें ' ( ' आणि अंगा बळ यावें । नातरी क्षुधा जावें । का जीभेचे पुरावे । मनोरथ ॥ अशनाचेनि पावकें । हारपता प्राणु पोखे । याचि भागु मोटकें । अशन करी ॥ ' ज्ञा. १८–१०२४-२६ ). शरीराची आटणी करण्यात देहभाव कमी होत असतो व आत्मभावाचा विकास होत असतो. हें पटवून देण्या-करितां ज्ञानेश्वरमहाराजांनीं दोनतीन मोठे मार्मिक दृष्टान्त दिले आहेत. ते म्हणतात, ' धूपाचा अग्निप्रवेशानें नाश होतो खरा, पण त्या नाशाचें पर्यवसान सुगंध निर्माण करण्यात होत असतें. ( किंवा पिकाचें वाळणें धान्योत्पत्तीस कारण होतें ). अथवा हिणकस सोन्याला शुद्ध करण्यात त्याचें वजन कमी होतें परंतु त्याचा कस जसा वाढतो, त्याचप्रमाणें शरीराचा तपानें व्यय होण्यात आत्म-भाव विकसित होतो असतो. एवढ्याकरिता आत्मभावाचा विकास

होण्याकरिता जें प्राण, इंद्रियें व शरीर यांचें शोषण केलें जातें, त्याला शारीरिक 'तप' म्हणावें ('तैसा स्वरूपाचिया प्रसरा- । लागीं प्राणेंद्रिय शरीरा । आटणी करणें जें वीरा । तेंचि तप ॥' ज्ञा.१६-१०८) कायाशुद्धि ही तपानें होत असते. आता स्वरूपाचा म्ह० आत्म्याचा प्रसर ( म्ह० विस्तार ) करावयाचा म्हणजे काय करावयाचें ? वास्तविक आत्मा सर्व ठिकाणीं आहेच. परंतु आपल्या बुद्धीमध्यें आत्म्याचा संकोच झालेला आहे. कारण आपण शरीरालाच आत्मा समजतों व हाच आहे आत्म्याचा संकोच ('जें देहखंडा नाम आत्मा । ' ज्ञा.१८-५६७). तेव्हां जसा आत्मा आहे तसा त्याला यथार्थपणें बुद्धीनें जाणणें व अनुभविणें हाच आहे बुद्धीचा व आत्म्याचा विस्तार ('सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि । ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥' गीता ६-२९; ('म्हणोनि ज्ञान जेतुलें दावी । तेतुली ही वस्तुचि आघवी ।' (ज्ञा. १३-६२८). आत्मप्राप्तीच्या मार्गांत शरीराची आटणी करण्यात, देहतादात्म्य कमी होतें व बुद्धीचा विकास होऊं लागतो. म्हणून शारीरिक तप आवश्यक आहे.

पारमार्थिक गोष्ट असो अथवा व्यावहारिक गोष्ट असो ती साध्य होण्याकरिता तप हें अवश्य लागत असतें. खुद्द ब्रह्मदेवास सृष्टि उत्पन्न करण्याचें ज्ञान व सामर्थ्य हीं दोन्ही त्यानें केलेल्या तपामुळेंच त्याला प्राप्त झालें असा श्रीमद्भागवतात कथाभाग आहे. ब्रह्मदेव जेव्हां पाण्यांतून निर्माण झालेल्या कमलांतून बाहेर पडले तेव्हा आपण कोण, कोठून आलों, हें कांहींच त्यास कळेना. कमल तरी कोठून निघालें, ह्याचा शोध करण्यासाठीं कमलनालांतून ते खालीं गेले, पण कित्येक वर्षें शोध करूनहि त्यास कांहींच पत्ता लागेना. शेवटीं ते थकून वर येऊन पुन्हा त्या कमलावर येऊन बसले आणि गोंधळून गेले व वेड्यासारखे इकडे तिकडे पाहूं लागले ('पैं सृष्टीचिया उपक्रमा- । पूर्वीं गा विरोत्तमा । वेडा ऐसा ब्रह्मा । एकला होता ॥ मज ईश्वरातें नोळखे । ना सृष्टिहि करूं न शके । ' ज्ञा. १७-२३६-३७) त्यांना कळेनाच; कीं आपण येथें

कशाकरिता आलों आहोंत. समजा! एखाद्या माणसाला आपण बोलावलें व त्याला चार भिंतीच्या खोलींत कोंडून ठेवलें व सगळे निघून गेले, तर तो जसा गोंधळून जातो व त्याला कल्पना येत नाहीं कीं, आपल्याला येथें कशाकरिता आणून ठेवलें; तद्वतच ब्रह्मदेवाची स्थिति झाली. शेवटीं त्याच्या कानावर अशरीरी वाणी आली की, तूं तप कर.' तेव्हां त्यानें कित्येक वर्षें तप केलें व त्या तपाच्या प्रभावानें त्याला सृष्टि निर्माण करण्याचें ज्ञान व सामर्थ्य प्राप्त झालें (' जयाचा अर्थु जीवीं ध्यातां। जें वर्णत्रयचि जपता। विश्वसृजनयोग्यता। आली तया ॥' ज्ञा. १७–३३८). तपामुळेंच ऋषिजनांच्या ठिकाणीं प्रति-सृष्टि निर्माण करण्याचें सामर्थ्य आलें व भगवंताला तपामुळेंच अवतार घ्यावे लागले आहेत (' तपोवळें ऋषिजन। प्रतिसृष्टि जाण करूं शकती ॥ नवल तपाचें कौतुक। तापसां भिती ब्रह्मादिक। तपस्वियांचें नवल देख। दशावतारादिक विष्णूसी ॥' चतुःश्लोकी भागवत ९०–९१). तात्पर्य, तप ही एक मोठी शक्ति आहे व म्हणून आमच्या वैदिक धर्मात ज्ञानाच्या जोडीला नेहमीं तप सांगितलेलें असतें (' तैसे यमनियमीं कडसले। जे तपोज्ञानी चोखाळले।' ज्ञा.४–६५). ज्ञान जीवनात उतरण्याकरिता तप पाहिजे. आत्मप्राप्ति करून देणारें तप हें एक दिव्याजनच आहे असें एकनाथानीं म्हटलें आहे (' तप तें परम निधान। साधकाचें निजसाधन। ब्रह्मप्राप्तीचें दिव्यांजन। ऐकोनी चतु-रानन विचारी ॥' चतुःश्लोकी भागवत ९५).

गीतेंत सात्विक तप हें कायिक, वाचिक आणि मानसिक असें तीन प्रकारचें सांगितलें आहे. प्रत्येक मनुष्याला स्थूल, सूक्ष्म व कारण अशीं तीन शरीरें असतात. यांपैकीं स्थूल, शरीर प्रत्येकाला चर्मचक्षूंनीं पहाता येतें, सूक्ष्म शरीराचा अनुभव स्वप्नांत येत असतो व या दोन देहांना कारणीभूत जें स्वस्वरूपाचें मूळ ' व्यष्टि अज्ञान ' त्याला शास्त्रकार ' कारण शरीर ' म्हणतात. ह्या तीन देहांच्या शुद्ध्यर्थ तीन प्रकारचें तप आहे. देवाची पूजा करणें, देवदर्शनास जाणें, देवळासमोरचें अंगण रांगोळ्यादिकांनीं

सुशोभित करणें, यात्रा करणें, विधिविनयादिकांनी युक्त अशा ब्राह्मणाशीं व आईवडिलांशीं आदरयुक्त वागणें, आश्रमविहित ब्रह्मचर्यव्रताचे यथावत् अनुष्ठान करणें व मित आहार घेणें इत्यादिकांचा अंतर्भाव शारीरिक तपांत होतो ( ' देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जनम्। ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥ ' गीता १७–१४ ). आपलें पूर्वीचें जीवन योग्य आंखलेलें असे. त्यांत प्रपंच करून तिन्ही प्रकारचीं तपें घडत असत. उदाहरणार्थ, पतिव्रता स्त्री ही आपल्या घरांतील सर्व कार्यें करून आपल्या मुलाची व पतीची सेवा करी व तसें करण्यांत तिच्याकडून तपच घडत असे ( ' पैं आघवाची भोगेंसी । पतिव्रता क्रीडे प्रियेसी । कीं तयाचि नामें जैसीं । तपें तिया केली ॥ ' ज्ञा. १८–९०७ ). याबाबतींत एक कथा सुप्रसिद्ध आहे, ती अशी—

' एक तपी होता. त्याला तपानें सिद्धि प्राप्त झाली होती. एकदां असा प्रसंग कीं, हा तपी आपलें आन्हिक संपवून स्वस्थ बसला असतांना एका आकाशांत संचरणाऱ्या बगळीनें आपला प्रातर्विधि केला व तो त्याच्या डोक्यावर पडला. म्हणून त्यानें मान वर करून आकाशाकडे सहज नजर टाकली. त्याबरोबर ती बगळी जळून खाक होऊन खालीं पडली. यामुळें याला असें वाटलें कीं, आपण आता पूर्णतः सिद्ध पुरुष झालों. नंतर तो गांवांत नित्यक्रमाप्रमाणें भिक्षा मागण्यास फिरतां फिरतां एका महान् पतिव्रता स्त्रीच्या घरीं भिक्षा मागण्यास आला व दारातच उभा राहून ओरडला, " माई भिक्षा लाव ! " ती बाई आपल्या पतीची सेवा करीत होती व म्हणूनच ती घरातूनच म्हणाली, " थांबा जरा ! मी भिक्षा घेऊन येतें. " हें ऐकून हा मनांत संतप्त झाला, कारण तिनें त्याला ' थांबा ' म्हणण्यात आपला अपमान झाला असें त्याला वाटलें. ती जेव्हां भिक्षा घेऊन आली, तेव्हां यानें तिच्याकडे डोळे वटारून पाहिलें. त्याबरोबर ती म्हणाली, " मी काहीं बगळी नाहीं, कीं तुमच्या अशा डोळे वटारण्यानें जळून जाईन. " तेव्हां याला आश्चर्य वाटलें व तो तिला म्हणाला, " माई ! ही गोष्ट आपणांस कशी कळली ? " त्यावर ती म्हणाली,

" हे पहा ! मी दररोज माझ्या पतीची सेवा मनोभावानें करीत असतें व या तपामुळें मला दूरचें दिसण्याची व जाणण्याची सिद्धि प्राप्त झाली आहे. काशींत धर्मव्याध राहतात. त्यांच्याकडे आपण जा व मग ते तुम्हाला उपदेश करतील व त्यानें तुम्ही कृतार्थ व्हाल. " सांगण्याचा भावार्थ असा कीं, आमच्या धर्माची ठेवणच अशी आहे कीं, वर्णाश्रमविहित आचारधर्म पाळत असतांना आपोआप कायाशुद्धि व मनशुद्धि होत असते. संध्या हेंहि एक उत्कृष्ट तप आहे. संध्येसारखी काया, वाचा व मन यांवर उपकार करणारी दुसरी गोष्ट नाहीं. आता लोकांना साधी संध्या समजत नाहींशी झाली आहे. मुंज किंवा लग्नाचे प्रसंगीं साधें धोतर नेसावयाची पंचाईत ! मग संध्या कोठून करणार ? वडिलांनांच संध्या येत नाहीं मग ते मुलांना काय शिकविणार ? खरें सांगावयाचें तर मुंजींत मुलाला गायत्री मंत्र देण्यापूर्वी बापाला त्या गायत्री मंत्राचा जप हजार वेळा करावा लागत असतो. एका गृहस्थाला आपल्या वडीलाचें श्राद्ध करावयाचें होतें. म्हणून तो दोन्ही बाजूला जानवी घालून श्राद्ध करावयास बसला. गुरुजी कांहींच बोलेनात. यानें विचारलें, तेव्हा गुरुजी म्हणाले, " तुमच्या वडिलांचे श्राद्ध झालें, मी आपणास अधिक काय सांगणार ? " संध्या, श्राद्ध हे शारीरिक व वाचिक तप आहे.

इतरास उद्वेग येईल असें न बोलणें व बोलणें अवश्यकच असेल तेव्हां सत्य, प्रिय आणि हितकर असेंच बोलणें; स्वाध्याय म्हणजे वेद-वेदांगाचे यथाशक्ति अध्ययन करणें आणि ईश्वराच्या नाममंत्रादिकांचा जप करणें याला वाङ्मय म्हणजे वाणीचें अथवा वाचिक तप म्हणतात ( ' अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितंच यत् । स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ ' गीता १७-१५). सत्य म्ह० खरें बोलणें, हे मोठें तप आहे. परंतु खोटें बोलणें हें लोकांच्या इतकें अंगवळणीं पडलें आहे कीं, आपण खोटें बोलत आहोंत हेंहि त्यांना कळत नाहीं. या बाबतींत मी माझें स्वतःचेंच

एक उदाहरण विनोदानें देत असतों—मी टोपी घालून कांहीं विशिष्ट कामाकरितां घराच्या बाहेर पडलेला असतों. इतक्यांत रस्त्यांत मला कोणी भेटले व विचारलें कीं, ' आपण इकडे कोठें चाललां आहांत ? तर मी म्हणतों, " आपला उगीच सहज चाललों आहे ! " आतां सहज चालण्याकरितां मी कांहीं वारा आहे कीं काय ? पण खोटें बोलणें हें सरावाचेंच झालें असतें. दुसरें उदाहरण द्यावयाचें तर, आपल्या घरीं जेवणावळ असली म्हणजे आपण आपल्या नोकराला निमंत्रितांच्या घरीं ' पानें वाढलीं आहेत, आपला खोळंबा आहे. तरी लौकर जेवावयास चला ' असें जाऊन सांगण्यास सांगतों. परंतु वस्तुतः पानें मांडण्याची जागा अजून झाडलेलीहि नसते. किंवा कीर्तन सुरू होण्याची वेळ ही बहुधा रात्रीं साडेनऊ अशी छापलेली असते परंतु कीर्तनास सुरुवातहि दहाच्या पुढेंच होत असते. कारण साडेनऊ छापले म्हणजे साधारणतः लोक दहा वाजेपर्यंत जमा होत असतात. असत्य बोलण्यानें मनुष्याची अवनति होते. सत्य बोलण्यानें ' वाचासिद्धि प्राप्त होते. ज्ञानेश्वरमहाराजांनीं अनेक कल्पपर्यंत वाणीनें खरें बोलण्याचें तप केलें होतें म्हणूनच त्यांच्याकडून गीतेवर ज्ञानेश्वरी-सारखी अलौकिक टीका लिहिली गेली असें त्यांनीं म्हटलें आहे. ( ' माझिया सत्यवादाचें तप । वाचा केलें बहुत कल्प । तया फळाचें हे महाद्वीप । पातली प्रभु ॥ ' ज्ञा. १६–३२ ). सत्य बोलण्यानें व स्वाध्यायाच्या अभ्यासानें वाणीची व चित्ताची शुद्धि होत असते.

आतां मन शांत आणि प्रसन्न राखणें, आत्मनिग्रह ठेवणें व सद्वासना मनांत नेहमीं बाळगणें, इत्यादि प्रकार मानसिक तपांत येतात. ( ' मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः । भावसंशुद्धि-रित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ ' गीता १७–१६ ). या तिन्ही प्रकारच्या तपांचा उपयोग चित्तशुद्धीकरिता आहे ( ' यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥ ' गीता १८–५ ). महामुनि पतंजलींनी

या सर्व तपाचा अंतर्भाव क्रियायोगात केला आहे ( ' तपःस्वाध्यायेश्वरप्रणिधानानि क्रियायोगः ॥ ' योगसूत्र २-१ ) व यानें शरीर शुद्ध होतें व चित्तातील मल व रज दोष जाऊन तें शांत होतें व चित्ताला एकाग्रता प्राप्त होते. विशेषतः समाधीचा अथवा ध्यानादिकांचा अभ्यास करीत असतांना चित्तांतील अविद्या, अस्मिता, राग, द्वेष आणि अभिनिवेश हे पंच क्लेश, त्या अभ्यासाला प्रतिबंधक होत असतात. परंतु क्रियायोगानें हे पंच क्लेश शिथिलभावास प्राप्त होतात आणि मग चित्तानें ध्यान करणें सुलभ होते ( ' समाधिभावनार्थः क्लेशतनूकरणार्थश्च ॥ ' योगसूत्र २-२ ).

आतांपर्यंत जें त्रिविध तप सांगितलें त्याला साधनतप अथवा बहिरंग तप म्हणतात. परंतु नुसत्या साधनतपानें कार्यभाग होत नाहीं. साधनतपानें अंतःकरणांतील मलदोष ( म्ह० पापवासना व कामक्रोधादिक विकार ) आणि विक्षेपदोष ( म्ह० अंतःकरणाची चंचलता ) हे दोन दोष नष्ट होतात व चित्ताला एकाग्रता प्राप्त होते. म्हणजे तें ध्यानाला व आत्मसंस्थ करण्यास योग्य होतें. परंतु ' मी देह आहे व मी कर्ता, भोक्ता, जन्मणारा व मरणारा आहे ' अशा प्रकारचें जें स्वस्वरूपाचें अज्ञान, ज्याला शास्त्रीय भाषेंत ' आवरणदोष ' म्हणतात, तो दोष साधनतपानें नष्ट होत नाहीं. त्याच्याकरितां आत्मानात्मविवेकाचें अखंड चिंतन अथवा मनन करावें लागतें. या आत्मानात्मविवेकालाच साध्यतप अथवा अंतरंग तप किंवा ज्ञानमय तप असें म्हणतात. ज्ञानेश्वरमहाराजांनीं या आत्मानात्मविवेकालाच , आत्मपर्यालोचु ' ( म्ह. आत्मविचार ) असा शब्द योजलेला आहे व हें तप ' शरीराची आटणी करणें ' ( म्ह. शारीरिक तप ) यांहून भिन्न आहे. ( अथवा अनारिसें । तपाचें रूप जरी असे । तरी जाण जेवीं दुधीं हंसें । सूदली चांचु ॥ तैसें देहजीवाचिये मिळणी । जो उदयजत सूये पाणी । तो विवेक अंतःकरणीं । जागवीजे ॥ तैसा आत्मपर्यालोचु । प्रवर्ते जो साचु । तपाचा हा निर्वेचु । धनुर्धरा । ' ज्ञा. १६—

१०९-११०-१२२ ). हे ज्ञानमय तप आहे, हें मन व बुद्धि यांच्या योगानें होणारें आहे. शरीरानें होणारें नाहीं ( ' मनें मन घालूनि मागें । विश्रांति जालिया आंगें । ते देहीं देहाजोगे । होतीचि ना ॥ ' ज्ञा. १४-५० ).

या जगतामध्यें सार व असार अथवा आत्मा व अनात्मा म्हणजेच आत्मा व जगत् व जगदंतःपाती, देहादि सर्व उपाधि यांची सरमिसळ झालेली आहे. आपण देहाचे धर्म आत्म्याच्या ठिकाणीं व आत्म्याचे धर्म देहाच्या ठिकाणीं आरोपीत असतों. उदाहरणार्थ, ल्हान मुलें घिसाड्याच्या दुकानावरून चालली असतां घिसाडी लोखंडाच्या गोल्कावर घाव घालीत असतांना ती पाहतात व एकमेकांना म्हणतात, ' पहा ! अग्नि कसा वाटोळा आहे व लोखंड कसें तप्त व लाल आहे" वास्तविक वाटोळें असते लोखंड व तप्त व लाल असतो अग्नि. त्याचप्रमाणें आपण ' देहाचें उत्पन्न होणें व नाश पावणें ' इत्यादि धर्म आत्म्यावर आरोपितों व देहाबरोबर जीवात्मा जन्मास येतो व देहाबरोबर मरतो असें समजतों. तद्वतच देह हा मिथ्या असतांना सत्यत्व हा जो आत्म्याचा धर्म तो आपण देहावर आरोपीत करतों व देह सत्य आहे असें मानतों. ही जी देह व आत्मा यांची भेसळ झालेली आहे त्यांची वेगळीक आत्मानात्मविवेकानें होते. म्हणजे आत्मानात्मविवेक हा आत्म्यास देहापासून अलग करतो.

वास्तविक आत्मा व देह यांचें मिश्रण होणेंच शक्य नाही. कारण हे दोन्ही पदार्थ सजातीय पदार्थ नाहींत. आत्मा हा अनादि, निर्गुण व अव्यय आहे ( ' अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः ॥ ' गीता १३-३१ ). ह्याच्या उलट देहाच्या मागें उत्पत्ति व नाश आहेत व तो गुणात्मक आहे ( ' देह तंव पांचांचें जालें । हें कर्माचें गुणी गुंतलें । भवतसे चाकीं सुदलें । जन्ममृत्यूच्या ॥ या देहाची हे दशा । आणि आत्मा तो एथ ऐसा । पैं नित्य सिद्ध आपैसा । अनादिपणे ॥ ज्ञा. १३-११०२-६ ). तेव्हां ह्याचें मिश्रण म्हणजे दूध व पाणी या दोन सत्य वस्तूंचें जसें क्रियेनें झालेलें

सत्य मिश्रण असतें त्याप्रमाणें नव्हे. सत्य मिश्रणाचे विभाग क्रियेनें करता येतात. परंतु आत्मा व देह याचें मिश्रण काल्पनिक आहे व म्हणूनच त्याची वेगळीक विचारानें म्हणजे आत्मानात्मविवेकानेंच होऊं शकते, अन्य उपायांनीं होत नाहीं. आत्मा व देह याचा संबंध अध्यस्त म्हणजे कल्पित अर्थात् क्रमानें भासणारा आहे. आत्मा हा अज्ञानाला वश झाला म्हणजे तो भ्रान्त कल्पनेनें देह निर्माण करतो व त्याच्याशीं भ्रान्तिज तादात्म्य करतो ('तैसा आपुलिया विस्मृती । आत्मा आपणचि प्रकृती-। सारिखा गमोनि पुढती । तियेसीचि भजे ॥' ज्ञा. १५–३५४) वास्तविक देह हा मृगजलवत् आभासिक आहे. परंतु तो आत्म्यावर प्रतीत होतो यास कारण अविद्यावृत चित्तरूप उपाधि म्हणजेच भ्रान्त कल्पना होय. ज्याप्रमाणें चंद्र एकच आहे, परंतु डोळ्यावर बोट धरून त्याकडे पाहिलें असता दोन चंद्र दिसतात ('एकश्चंद्रः सद्वितीयवत्' अध्यासभाष्य) त्याप्रमाणें एकच आत्मा असतांना मायेमुळें म्ह० कल्पनेमुळें त्याच्या ठिकाणीं देहादिकांचा भास होतो. तेव्हां आत्मा व देह यांचा अर्थाअर्थी कांहींहि संबंध नाहीं ('उजियेडा आणि अंधारेयां । जो पाड्ड मृता उभया । तोचि गा आत्मया । देहा जाण ॥' ज्ञा. १३–११००; 'कोणाचा कोणासीं न धरें संबंध । आहे शुद्धबुद्ध ठायींचें ठायीं ॥' तुका. ३८६१); परंतु भ्रान्त जीव देहाचे जन्ममरणादि धर्म आत्म्यावर आरोपितात व 'अहम्' ही प्रतीति आत्म्याची असताना तिचा आरोप देहावर करतात व देहाच्या अस्तित्वानुसार आत्म्याचें अस्तित्व आहे असें मानतात; परंतु ज्याच्या ठिकाणीं आत्मानात्मविवेक उत्पन्न झालेला आहे, तो देहाचे जन्ममरणादि धर्म देहाचेच ठिकाणीं पहातो व आत्मा हा देहाबरोबर उत्पन्नहि होत नाहीं व त्याच्याबरोबर नाशहि पावत नाहीं असा तो अखंड त्रिकालाबाधित अतएव नित्य आहे असें जाणतो ('येथ आत्मा आत्मयाच्या ठायीं । देखिजे देहींचा धर्मु देहीं । ऐसें देखणें ते

पाहीं। आन आहाती ॥' ज्ञा. १५–३८१ ). मिथ्यत्वाचें ज्ञान झाले कीं, कल्पित वस्तूचा नाश अथवा बाध ( म्ह० दृढमिथ्यात्व-निश्चय ) आपोआपच होतो. उदाहरणार्थ, रज्जूचें ज्ञान झालें कीं, त्यावर भासलेल्या सर्पाचा नाश लगेंच होतो. सर्प, मृगजल अथवा देहादि पदार्थ हे भ्रमजन्य असल्यामुळें त्याचा बाध हा केवळ ज्ञानानेंच होत असतो. म्हणून आत्मनात्मविवेकरूपी ज्ञानमय तपाला शारीरिक तपापेक्षा अधिक महत्त्व आहे. नाहींतर केवळ शरीराचें शोषण करणारे व हातात चिमटा घेऊन भटकणारे काहीं बैरागी लोक असतात; परंतु त्यांना आत्मप्राप्ति होत नाहीं. नाथमहाराज म्हणतात, 'शरीरशोषणा नाव तप। हा मूर्खांचा खटाटोप ॥' ए. भा. १९–३९९ ). त्याचप्रमाणें काहीं जन्मभर वेदान्त सांगणारे असतात; परंतु त्यांना आत्मानुभव प्राप्त होत नाहीं. ह्याचें कारण ते संयतेन्द्रिय नसतात म्हणजे त्यांचे ठिकाणीं शारीरिक तपाचा अभाव असतो ('कैसें निरूपिती शुद्धब्रह्म। ऐकोनि सात्विका येत प्रेम। परी निह्रुदयींचा भ्रम। निरसे तें वर्म नेणेची ॥ जेवीं गुळ उसाचा घाणा। तोंडींचा रस भरे माणां। शब्दसोपटें भरोनि वदना। करी परिभ्रमणा करकरितू ॥' ए. भा. ३–२८०–८१ ). तेव्हां आत्मप्राप्तीकरितां बहिरंग ( शारीरिक ) व अंतरंग ( ज्ञानमय ) या दोन्ही तपाची जरूरी आहे.

तपी हा मुख्यतः 'आत्मपर्यालोचु' म्हणजे आत्मविचाराचें वारंवार आलोचन करणारा अर्थात् मनन करणारा असावयास पाहिजे. म्हणून तो मेधावी पाहिजे, त्याच्या ठिकाणीं धारणाशक्ति चांगली पाहिजे. ध्यानाकरिता व शास्त्राभ्यासाकरिता बुद्धि कुशाग्र म्हणजे सूक्ष्म व चलाख लागत असते. ('दृश्यते त्वग्र्यया बुद्धया सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः ॥' कठ. उप. १–३–१२ ). बुद्धिमांद्य हा आत्मदर्शनाचे बाबतींत एक मोठा प्रतिबंध गणलेला आहे. श्रवण केलेल्या अर्थाचें ग्रहण करण्यास व धारण करण्यास

बुद्धि तत्पर नसणें, यास 'बुद्धिमांद्य' म्हणतात. एक गुरुजी होते त्यांनीं आपल्या विद्यार्थ्यांस भगवद्गीता अथपासून इतिपर्यंत सांगितली. समातीच्या दिवशीं कोणास कांहीं शंका असल्यास त्यानें ती खुशाल विचारावी असें गुरुजींनीं सांगितलें. त्यावर त्यांतील एक विद्यार्थी उभा राहिला व म्हणाला, 'गुरुमहाराज! मला आपणांस एक शंका विचारावयाची आहे.' हें पाहून गुरुजींना फार आनंद वाटला. त्यांना वाटलें ह्या सर्व विद्यार्थ्यांत निदान एक मुलगा तरी चांगला हुशार व चुणचुणीत दिसतो. त्याच्या बुद्धीच्या खोलीची कल्पना त्यांना आली नव्हती. ते म्हणाले, 'अरे! अवश्य विचार.' तो म्हणाला, गुरुमहाराज! गीताग्रंथास प्रारंभ करण्यापूर्वीं तुम्ही गीतेचें महात्म्य वर्णन करणारा 'सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनंदनः पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥ असा जो श्लोक सांगितला होता, त्यांत 'दोग्धा' या शब्दानें जे 'दोन गद्धे' सांगितले आहेत, त्याचे स्पष्टीकरण आतापर्यंत आपल्या सर्व प्रवचनातून मुळींच आले नाही. तेंव्हा हे 'दोन गद्धे' कोण आहेत, हें आपण मला कृपा करून सांगावें.' गुरुजी म्हणाले, 'अरे! तूं तर स्वयंभू गर्दभ आहेसच आणि तुझी योग्यता न जाणता मी तुला सर्व गीता सांगितली. यास्तव दुसरा गद्धा मी आहे!' या गोष्टीतील विनोद आपण सोडून द्या. परंतु या गोष्टीचे रहस्य असें आहे कीं, गीताशास्त्राचा अधिकारी हा मेधावी असावयास पाहिजे. कारण गीताशास्त्रांत आत्म्याविषयींचा जो विचार सांगितला आहे तो अत्यंत सूक्ष्म व गहन असा आहे. ('अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते ॥' गीता८–३, 'अनदिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥' गीता १३–१२, 'सुक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चांतिके च तत् ॥' गीता १३–१५) व आत्मप्राप्तीकरता गीतेनें जी साधनप्रणाली सांगितली आहे, त्यांत विवेकासारखीं अशीं साधनें आहेत कीं, ज्याचें श्रवण करीत असताना 'बुद्ध्यादिकांचे भोकसे' जातात, असें ज्ञानेश्वर–महाराजांनीं म्हटले आहे ('विवेकश्रवणें अतित्रासें। जेथ ब्रता-

चरणें कर्कशें। करिता जाती भोकसे। बुद्धयादिकांचे ज्ञा. १८–७८३ ).

आत्मविचाराचें नुसतें श्रवण करून भागत नाहीं. तर त्याचें वारंवार मनन व निदिध्यासन करावें लागतें. एवढ्याकरिता श्रुतीनें 'आत्मा वा रे श्रोतव्य :' एवढें सांगितल्यानंतर 'मन्तव्यः निदिध्यासितव्यः' ( ब्रुह. उप० ३–५–६ ) असें सांगितलें आहे. गुरूनें 'तत्त्वमसि' या महावाक्याचा उपदेश केल्यानंतरहि कित्येक वेळां साधकाच्या मनांत 'मी ब्रह्म नसून देहच मी आहे' अशी विपरीत भावना उत्पन्न होत असते. एवढेंच नव्हे तर आत्म्याचे अपरोक्ष ज्ञान जरी झालें तरी अनेकजन्मार्जित देहात्मबुद्धीच्या संस्कारापासून उत्पन्न झालेला जो देहाध्यास तो ज्ञानाला उदकावरील शेंवाळ्याप्रमाणें नेहमी आवरण करीत असतो. 'बहुजन्मदृढाभ्यासाद्देहादिष्वात्मधीःक्षणात्। पुनःपुनरुदेत्येवंजगत्सत्यत्वधीरपि॥' असें विद्यारण्यस्वामींनी पंचदशीत ( पंचदशी ७–३ ) म्हटलें आहे. ह्या देहाध्यासालाच विपरीत भावना म्हणतात. विपरीत भावना ( म्ह० उलटी समजूत ) ही बलवत्तर कशी असते याची कल्पना येण्याकरितां मी आपणास एक गोष्ट सांगतों.

एका क्षेत्रामध्ये एक महादेवाचे जागृत स्थान होतें. त्या महादेवाच्या दर्शनाला नेहमी शेकडो यात्रेकरू येत असत. त्या क्षेत्रात एक मोठा पिंपळ होता. त्याला लोक विनोदानें पोटभऱ्या पिंपळ म्हणत. कारण त्या ठिकाणी क्षेत्रोपाध्याय लोक यात्रेकरूंना गाठण्याकरितां येऊन बसत. एकदां असा प्रसंग घडला कीं, एक भाविक यात्रेकरू आपल्या बायकामुलांना घेऊन पुष्कळ वर्षानंतर या क्षेत्रातील महादेवाच्या दर्शनाला आला. त्याला पाहिल्याबरोबर एक क्षेत्रोपाध्याय त्याच्याजवळ गेला व त्यांना म्हणाला, 'महाराज! आपण कोणाकडे उतरणार?' हा गृहस्थ म्हणाला, "मी येथें सुमारें तीस वर्षापूर्वी आलो होतो, तेव्हा येथें एक 'नाना' नांवाचे क्षेत्रोपाध्याय होते त्यांच्यांकडे मी उतरलों होतों.

तेव्हां या वेळीहि मी त्यांच्याकडेच उतरणार आहें. " 'नाना' हें नांव ऐकल्याबरोबर या क्षेत्रोपाध्यानें एकदम रडण्यासच सुरुवात केली व तो म्हणाला, ' अहो ! ते तर आमचे चुलते. ते नुकतेच वारले व म्हणून त्यांच्याकडे उतरणारी सर्व मंडळी आता माझ्याकडेच उतरतात तेव्हां आपण मंडळींनी माझ्याकडेच उतरावयास यावें. "

हा गृहस्थ मग त्याच्याकडेच उतरावयास गेला. परंतु ' बुभुक्षितः किं न करोति पापम् ' या न्यायानुसार या क्षेत्रोपाध्यायानें वास्तविक ' नाना ' साक्षात् जिवंत असतांना व चांगले हिंडत फिरत असतांना ह्या यात्रेकरूनें आपल्याकडे उतरावें एवढ्याकरितां त्याला खोटीच थाप मारली होती कीं, नाना हे मरण पावले. तेव्हा कदाचित् ' नाना आपल्या यात्रेकरूला एखादे वेळी रस्त्यांत भेटतील म्हणून या क्षेत्रोपाध्यायानें त्या यात्रेकरूला आणखी खोटेंच सांगितलें कीं, ' हे बघा ! आमचे चुलते नाना इतके भगवद्‌भक्त होते व त्याची महादेवावर एवढी अढळ श्रद्धा होती कीं, ते भूत होऊन आता या क्षेत्रात राहिले आहेत व अजून रोज दुपारीं बारा वाजण्याच्या सुमारास ते महादेवाला सोवळयाने नैवेद्य घेऊन जाताना दिसतात. ' अशी या क्षेत्रोपाध्यायानें त्या यात्रेकरूची विपरीत भावना करून दिली.

पुढें हा यात्रेकरू दुपारीं बारा वाजण्याच्या सुमारास नदीवर स्नान करण्यास गेला असतांना ' नाना ' त्याच्या नित्याच्या क्रमाप्रमाणें महादेवाला सोंवळें नेसून नैवेद्य घेऊन जात होते. त्यांनीं या यात्रेकरूला पाहिलें व त्यांना आश्चर्य वाटलें कीं हें आपलें नेहमीचे गिऱ्हाईक आपल्या घरीं उतरावयास कसें आले नाहीं ! म्हणून त्यांनीं या यात्रेकरूला दुरूनच हाक मारली, ' अहो भाऊसाहेब ! तुम्ही केव्हां आलात ? ' त्याबरोबर त्याची दृष्टि त्या नानांकडे गेली. परंतु त्याच्या क्षेत्रोपाध्यायानें ' नाना हे मरून भूत झाले आहेत व ते दुपारी नैवेद्य घेऊन जाताना दिसतात ' अशी त्याची विपरीत समजूत करून दिली असल्यामुळें त्यांना प्रत्यक्ष

पाहूनहि त्याचा आनंद न होता उलट, हा भयभीत होऊन पळूं लागला. हा विपरीत भावनेचा परिणाम आहे.

तद्वतच महावाक्याश्रवणानें जीवब्रह्मैक्यज्ञान झालें तरीहि 'मी देह आहे,' अशी ब्रह्मात्मैक्यज्ञानाहून विपरीत देहात्मबुद्धि मधून मधून अनंत पूर्वजन्मांच्या संस्कारानें उत्पन्न होत असते. या विपरीत भावनेचा संपूर्णतः नाश करण्याकरितां 'मी ब्रह्म आहे' असें निरंतर चिंतन करावें लागतें व अशा चिंतनालाच निदिध्यासन अथवां 'अहंग्रह उपासना' म्हणतात ('पै ध्याता आपणचि परी। ध्यानरूप वृत्तिमाझारीं। ध्येयत्वें धे हे अवधारीं। ध्यान रूढी गा॥' ज्ञा० १८-१०३३). अशा अहंग्रह ध्यानाने साधकाचें मन आत्मस्वरूपात (म्हणजे ब्रह्मस्वरूपात) स्थिर होतें व 'मी ब्रह्म आहें' अशा दृढ अपरोक्षानुभवावर तो प्राप्त होतो.

ह्याच्या पलीकडे अधिक प्राप्त असें दुसरें काहीहि नाहीं. ('सा कष्टा सा परा गतिः।' क.ठ० उप० १-३-११')- कारण ह्या अनुभवावर जो प्राप्त होतो तो जन्ममरणातीत होतो व त्याला अपरिमित अशा आत्मानंदाचा लाभ होतो.

तात्पर्य, गीता हें आत्मानुभवाचें शास्त्र असल्यामुळें गीतेचा अधिकारी हा तपी व मेधावी असावयास पाहिजे. तपस्वी म्हणण्यांत धारणाशक्तीचा अंतर्भाव होत असल्यामुळें श्रीमच्छंकराचार्यांनीं प्रस्तुत श्लोकावरील आपल्या भाष्यात हें गीताशास्त्र शुश्रूषाभक्तियुक्त तपस्व्याला किंवा शुश्रूषाभक्तियुक्त मेधावीला सांगावें असें म्हटलें आहे ('शुश्रूषाभक्तियुक्ताय तपस्विने तद्युक्ताय मेधाविने वा वाच्यम्'—गीताभाष्य). अनधिकाऱ्याला गीता सांगितली असता त्याचा उपयोग होणार नाहीं. ('ऐसें हळुवारपण जरी येईल। तरीच हें उपेगा जाईल। एऱ्हवीं आघवी गोठी होईल। मुकयाबहिरयाची॥' ज्ञा. ६-२६. भगवंतानीं अर्जुनाला गीताशास्त्र सांगितलें कारण तो प्रज्ञाकान्त होता ('मग म्हणे गा

प्रज्ञाकांता । उजवली अजि वक्तृत्वता । जे बोलाएवढा श्रोता । जोडलासि ॥ ' ज्ञा. १४–६३ ) व तसाच तो तपीहि होता (' जे त्रिविधमळकटा । तूं सांडिलासि सुभटा । म्हणौनि गीतेसीं मज वसौटा । जालासि गा ॥ ' ज्ञा. १५–५८१ ).

आतां ज्ञानेश्वरमहाराजांनीं प्रस्तुत श्लोकावर ज्या ओव्या लिहिल्या आहेत, त्यांचा आपण थोडक्यांत विचार करूं. या श्लोकास उपोद्घातात्मक म्हणूनहि ज्ञानेश्वरमहाराजांनीं कांहीं ओव्या लिहिलेल्या आहेत. त्यांत त्यांनीं गीताशास्त्राचें रक्षण व वाढ व्हावी एवढ्याकरितां भगवंतांनीं या श्लोकांत अर्जुनाला गीताशास्त्राचा संप्रदाय सांगितला आहे, असें म्हटलें आहे. नाहींतर वस्तूचा लाभ होतो, परंतु तिचें जतन म्हणजे रक्षण कसें करावें हें माहीत नसल्यास तिचा उपभोग घेणें मात्र घडत नाहीं. (' तरी निधान जोडावया । भाग्य घडे गा धनंजया । परी जोडिलें भोगावया । विपायें होय ॥ ' ज्ञा. १८–१४७५ ). या ग्रंथतींत ज्ञानेश्वरमहाराजांनीं दोन पौराणिक उदाहरणें दिलीं आहेत. एक श्रीसागरमंथनाचें व दुसरें नहुष राजाचें.

देव आणि दानव यांनी मंदराचल पर्वताची रवी व वासुकी सर्पाचा दोर करून क्षीरसमुद्राचें मंथन केलें. पुढें त्यांतून चवदा रत्नें निघालीं. त्यांत अमृत व सुरा निघाली. नंतर अमृत व सुरा या दोहोंच्या वाटणीसंबंधीं देव आणि दानव यामध्यें वाद सुरू झाला. शेवटीं भगवान् विष्णु यांनीं मोहिनीचें रूप धारण केलें. देवांना एका पंक्तीला बसविलें व दानवांना एका पंक्तीला बसविले. देवांना अमृत व दानवांना सुरा वाढण्यास सुरुवात केली. त्या वेळीं राहू कपटानें देवांच्या पंक्तीला बसून अमृत पिऊं लागला. हा प्रकार चंद्रानें विष्णूला नेत्राच्या खुणेनें कळविला. तेव्हां विष्णूनें आपलें सुदर्शन चक्र राहूच्या मानेवर मारून त्याचा शिरच्छेद केला. सांगण्याचा भावार्थ असा कीं, दानवांना जरी

अमृताचा लाभ झाला तरी त्याचें रक्षण त्यांना करतां आलें नाहीं. उलट ज्या अमृतानें अमरत्व प्राप्त झालें असतें तेंच अमृत दानवांच्या मरणाला कारणीभूत झालें ( ' पै क्षीरसागराएवढें । अविरजी दुधाचें भांडें । सुरां असुरां केवढें । मथितां जालें ॥ ते सायासहि फळा आले । जें अमृतहि डोळां देखिलें । परी वरिली चुकलें । जतनें ते ॥ तेथ अमरत्वा वोगरिलें । तें मरणालागीं जालें । भोगों नेणतां जोडलें । ऐसें आहे ॥ ' ज्ञा. १८–१४७६-७८ ). तशीच नहुषराजाचीहि कथा आहे. नहुष नांवाचा चक्रवर्ती राजा होता. त्यानें नव्याण्णव यज्ञ संपवून शंभराव्याला आरंभ केला होता. इंद्रानें वृत्रासुरांस मारलें होतें. वृत्रासूर हा ब्राह्मण होता. त्याच्या वधानें इंद्रास ब्रह्महत्येचा दोष आला म्हणून त्यास जलांत दडून वसावें लागलें. तेव्हां अर्थात कांहीं काळ इंद्रपद मोकळें पडलें म्हणून देव व ऋषि यांनीं मिळून नहुषाची इंद्रपदावर स्थापना केली. नंतर नहुषानें इंद्राणीस आपल्याकडे बोलविलें. तिनें बृहस्पतीचा सल्ला घेऊन नहूषास निरोप पाठविला. कीं, आपण अनुच्छिष्ट अशा वाहानांत वसून प्रथम मजकडे यावें. नंतर नहुषानें आपल्या रथास घोड्याऐवजीं सात ऋषीच जोडले आणि त्या रथांत बसून तो इंद्राणीकडे निघाला. वाटेंत हे ऋषि त्वकर पाय उचलीनात तेव्हां या ऋषींस ' सर्प सर्प ' म्हणून त्वकर चालण्याचा इशारा तो देऊं लागला. त्यामुळें ऋषीस राग आला व त्यांपैकी अगस्तीनें नहुषास " तूंच सर्प हो " असा शाप दिला. त्याबरोबर नहुष सर्प रूपानें स्वर्गांतून खालीं पडला. तात्पर्य, इंद्रपद मिळूनहि नहुषास त्याचा उपभोग घेतां आला नाहीं. ( ' नहुषु स्वर्गाधिपती जाहला । परि राहाटीं भांवांवला । तो भुजंगत्व पावला । नेणसी कायी ॥ ' ज्ञा. १८–१४७९ ). त्याप्रमाणें भगवंत अर्जुनाला म्हणतात कीं, अर्जुना ! हें गीताशास्त्र मी तुला सांगितलें, त्याचा योग्य क्षेम व वाढ होण्याकरितां तूं त्याचें संप्रदायपूर्वक अनुष्ठान कर. तरच तें फलद्रूप होईल. एऱ्हवीं

होणार नाहीं. ' ( ' तैसा श्रीगुरू प्रसन्न होये । शिष्य त्रियाही कीर लाहे । परी ते फळे संप्रदायें । उपासिलिया ।। ' ज्ञा. १८–१४८४ ).

तेव्हां भगवंत अर्जुनाला गीतेंचा संप्रदाय सांगतात. ते म्हणतात, ' तरी तुवां हें जें पार्था । गीताशास्त्र लाधलें आस्था । तें तपोहीना सर्वथा । सांगावें ना हो ।। ' ( ज्ञा. १८–१४८६ ). तपोहीनाला जर गीताशास्त्र सांगितलें तर तें त्याच्या नुसत्या डोक्यांत राहील, पण क्रियेंत उतरणार नाहीं. सामान्यतः लोक गीतेचें श्रवण करतात. पण सदा संसाराचेंच चिंतन करीत राहतात. त्यामुळें त्यांना आत्मसाक्षात्कार होण्याच्या ऐवजी ते सदा दुःखच भोगीत राहतात. नाथमहाराज म्हणतात कीं, आत्मानुभवही फक्त जो विरक्त पुरूष असेल त्याचीच मिरास आहे, इतरांची नाहीं. (' आत्मानुभव नव्हे मिरासी । जे वाटां लाभे गोत्रजांसी । हा लाहाणा विरक्तासी । जे देहलोभासी सांडिती ।। ' हस्तामलक ३२६). पंच विषयांच्याकडे धांव घेणारी वृत्ति अंतर्मुख होऊन आत्मस्वरुपांत समरस होण्याकरितां साधक हा वैराग्यसंपन्न म्हणजेच तपी असावा लागतो. म्हणूनच भगवंत अर्जुनाला सांगतात कीं, अर्जुना हें गीताशास्त्र तूं अतपस्व्याला सांगू नकोस. ह्याचाच अर्थ जो तपी आहे त्यालाच हें गीता शास्त्र सांगावें.

त्याचप्रमाणें तपस्वी असेल परंतु गुरुभक्तीच्या बाबतींत जो ढिला म्ह० भोंगळ आहे अर्थात् गुरुभक्तीच्या बाबतींत जो उदासीन आहे ' अथवा तापसुहि जाला । परी गुरुभक्तीं जो ढिला ' ( ज्ञा. १८–१४८७ ) त्याला वेदानें जसें अतिशूद्रास वेदाध्ययनापासून वगळलें आहे तसें तूं त्याला टाक म्ह० हें गीताशास्त्र सांगू नकोस. ' तो वेदीं अंत्युजु वाळिला । तैसा वाळीं ।। ' ( ज्ञा. १८–१४८७ ). कारण ज्या गुरूंपासून खरें ज्ञान प्राप्त होत असतें त्यांच्या ठिकाणींच ज्याची आदरबुद्धि नाहीं, त्याला ज्ञान सांगून तें कधींहि फलद्रूप होणार नाहीं. ( ' यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ। तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशंते महात्मनः ।। ).

तसेंच उत्तम तपी आहे, गुरूंच्यावर चांगली निष्ठा आहे पण गीताश्रवणाचीच ज्याला इच्छा नाहीं, त्याला गीताशास्त्र सांगूं नकोस. अशाला गीताशास्त्र सांगणें म्हणजें पालथ्या घागरीवर ओतलेल्या पाण्याप्रमाणें होय. उदाहरणार्थ आई व वडील हे दोघेहि डॉक्टरीच्या धंद्यांत निष्णात आहेत, मुलगा हुशार आहे व आईवडिलांच्या ठिकाणीं त्याची चांगली आदरबुद्धीहि आहे. परंतु मुलगा जर म्हणत असेल कीं मला वैद्यशास्त्राची आवड नाहीं, मला इंजिनियरच व्हावयाचें तर त्याला वैद्यशास्त्र सांगून काय उपयोग? किंवा मोती कितीहि पाणीदार असलें, तरी शरीरावर धारण करण्यास तेव्हांच तें योग्य होईल, जर त्या मोत्याला आंत दोरा घालण्याकरितां भोंक असेल तर (' मुक्ताफळ भलतैसें। हो परी मुख नसे। तवं गुण प्रवेशे। तेथ कायी ॥' ज्ञा. १८–१४९१). त्याचप्रमाणें मनुष्य कितीहि योग्यतेचा असला, परंतु तो श्रवणेच्छु नसेल तर त्याला गीता कौतुकानेंहि सांगूं नये (' म्हणौनि योग्य भलतैसें। होतु परी चाड नसे। तरी झणें वानिवसें। देसी हें तयां ॥ ' ज्ञा. १८–१४९४). घरांत गीता अथवा ज्ञानेश्वरी सांगण्यास सुरुवात झाली कीं लगेच जे चिरंजीव डोक्यावर टोपी घालून घराच्या बाहेर पडतात, त्यांना गीता सांगून काय उपयोग?

तद्वतच कोणी तपी व गुरुभक्त असून गीताशास्त्र ऐकण्यासाठीं जरी उत्सुक असला, तरी गीताशास्त्राचा प्रणेता जो भगवान् श्रीकृष्ण तो वासुदेव या नांवाचा एक प्राकृत मनुष्य होता असें समजून जो त्याचा द्वेष अथवा मत्सर करीत असेल म्हणजे भगवान् श्रीकृष्णाचें ईश्वरत्व मानावयास तयार नसेल, तोहि गीताशास्त्र सांगण्यास अयोग्यच आहे असें समजावें (' तरी गीताशास्त्रनिर्मिता। जो मी सकल लोकशास्ता। तया मातें सामान्यता। बोलेल जो ॥' ज्ञा. १८–१४९४). आतां विसाव्या शतकांत असें म्हणणारे लोक निघाले आहेत कीं, अर्जुन जो युद्धपराङ्गमुख होत होता तेंच बरोबर होतें. कारण तो अहिंसावादी होता व भगवंतांनीं त्याच्याकडून जें युद्ध करविलें तें अयोग्य होय. फक्त अर्जुनाची तशी

समजूत नव्हती, एवढेंच! तात्पर्य, जो भगवान श्रीकृष्णाची निंदा करणारा आहे तो जरी ब्रह्मदेवाच्या योग्यतेचा असला व त्याच्याजवळ तपादिकरून इतर साधन सामुग्री कितीहि असली तरी त्याला गीताशास्त्र देऊं नये ('काय बहु बोलों निंदका। योग्य स्रष्ट्यादिसारिखा। गीता हे कवतिका-। लागींहि नेदीं ॥' ज्ञा. १८-१५०६).

तेव्हां, एकंदरींत गीताशास्त्र सांगावें तरी कोणाला ही गोष्ट ज्ञानेश्वरमहाराजांनीं पुढील तीन ओव्यांत फार सुंदर रूपक योजून सांगितलें आहे. भगवंत म्हणतात 'म्हणौनि तपाचा धनुर्धरा। तळीं दाटोनि गाडोरा। वरी गुरुभक्तीचा पुरा। प्रासादु जो जाला॥ आणि श्रवणेच्छेचा पुढां। दारवंटा सदा उघडा। वरी कल्शु चोखडा। अनिंदारत्नांचा॥ ऐसा भक्तालयीं चोखटीं। गीतारत्नेश्वरु हा प्रतिष्ठीं। मग माझिया संवसाटीं। तुकसी जगीं॥' (ज्ञा. १८-१५०७-०९). या ओव्यांतून ज्ञानेश्वरमहाराजांनीं प्रस्तुत श्लोकाचा सर्व मथितार्थ ग्रथित केला आहे. भगवंत अर्जुनाला म्हणतात, "अर्जुना! ह्या गीतारत्नरूपी ईश्वराची तूं अशा भक्तरूपी शुद्ध मंदिरांत प्रतिष्ठापना कर, कीं ज्याच्या खालीं तपाचा पाया भरभक्कम आहे, वर गुरुभक्तीचें बांधकाम आहे. त्याचा श्रवणेच्छेचा दरवाजा सदा सताड उघडा आहे आणि अनिंदारूप रत्नाचा सुंदर कलश ज्याच्यांवर बसविलेला आहे, आणि असें केलेंस म्हणजे तूं जगतांत माझ्या योग्यतेला येशील.

तात्पर्य, गीता आपल्या पदरांत पडावी असें वाटत असेल तर त्याला तप पाहिजे. खाल्लेलें पचण्याकरितां गाय जशी रवंथ करीत असते, त्याप्रमाणें गीता पचनीं पडण्याकरितां गीतेंतील आत्मानात्मविवेकाचें वारंवार मनन करावयास पाहिजे. पंढरपूरची पायी वारी करणें, संतवाङ्मयाचा अभ्यास करणें, कीर्तनें, प्रवचनें करणें हेंहि एक प्रकारचें तपच आहे. गुरुभक्तीनें गुरुप्रसाद प्राप्त होत असतो गुरूची प्रसन्नता नसेल तर प्राप्त झालेली ही विद्या फलद्रूप होत नाहीं. या बाबतींत महारथी कर्णाचें उदाहरण प्रसिद्ध आहे.

श्रीपरशुरामांचा ब्राह्मणाखेरीज अस्त्रविद्या कोणाला द्यावयाची नाहीं असा पण होता. द्रोणाचार्यांनीं कर्णाला ब्रह्मास्त्र शिकविण्याचें जेव्हां नाकारलें, तेव्हां त्या अस्त्राची प्राप्ति परशुरामांच्याजवळून करून घ्यावी असा कर्णानें आपल्या मनाशीं निश्चय केला. नंतर ब्राह्मणाचा वेश घेऊन तो परशुरामांच्याजवळ गेला आणि त्यांची सेवा करून त्यांच्यापासून त्यानें अस्त्रविद्येची प्राप्ति करून घेतली. एकदां परशुरामांनीं कर्णाच्या मांडीवर मस्तक ठेवून निद्रा केली असतां, एक मोठा भुंगा कर्णाच्या मांडीखालीं आला व गिरमीटाप्रमाणें त्याची मांडी खालून पोखरूं लागला. हें भुंग्याचें रूप साक्षात् इंद्रानेंच धारण केलें होतें. कारण त्याला अशी काळजी पडली होती कीं, आपला मुलगा जो अर्जुन त्याचा पराभव कर्ण हा परशुरामांकडून प्राप्त झालेल्या अस्त्रविद्येनें करूं शकेल. तेव्हां परशुरामांची अवकृपा कर्णावर होणें आवश्य आहे. त्या भुंगाच्या सारख्या पोखरण्यानें कर्णानें आपली मांडी मुळींच हालविली नाहीं. कर्ण हा तसाच शूर होता. वास्तविक भुंगा म्हणजे कांहीं ढेकूण नव्हे. नुसता ढेकूण धोतरांत शिरला तर माणसाची गडबड होते. कीर्तनांत वेडकी शिरली तर सर्व समाज एकदम उठतो. परंतु कर्णानें तो भुंगा वारंवार दंश करीत असतांनाहि त्याची पूर्ण उपेक्षा केली व परशुरामांना तसेंच मांडीवर स्वस्थ झोपूं दिलें !

जेव्हां रक्ताचा प्रवाह परशुरामांच्या अंगाखाली गेला तेव्हां तो त्यांना गार लागला व त्यानें ते जागे झाले. पाहातात तों रक्ताचा पाट. तो एकंदर प्रकार पाहून परशुरामांना संशय आला व ते कर्णाला म्हणाले, " कर्णा ! ही ब्राह्मणप्रकृति नव्हे. क्षत्रियावांचून इतराच्यानें हे क्लेश सहन होणार नाहींत. तूं असत्य भाषण करणारा दिसतोस. तूं क्षत्रिय आहेस. खरें काय आहे तें सांग ! " तेव्हां कर्णानें सर्व खरा प्रकार सांगितला. त्यावर परशुराम म्हणाले, " कर्णा ! ज्याअर्थीं तूं मला फसविलेंस त्याअर्थीं माझ्याकडून जी विद्या शिकलास ती विद्या आयत्या वेळीं कामास येणार नाहीं. " पुढें अर्जुनाशीं ऐन

युद्धप्रसंगीं कर्णाच्या रथाची चाकें एकदम जमिनीत गेलीं. तो रुतलेला रथ बाहेर काढीत असतांनाच अर्जुनानें त्याच्यावर अस्त्रें सोडलीं व कर्ण रणांगणांत मूर्च्छित होऊन पडला व पुढें त्याचा अंत झाला.

तेव्हां आत्मज्ञान हस्तगत होण्याकरितां गुरुसेवा व तद्द्वारां गुरुप्रसन्नता आवश्य आहे. गुरु सांगतील त्या वेळेला श्रवणास नेहमीं उत्सुक असावयास पाहिजे. नाहींतर नुकतेंच आतां जेवण झालें आहे किंवा झोपेची वेळ झाली आहे, इत्यादि सबबी सांगून गुरूंना डावलूं नये. गुरु कांहीं ऐकणाऱ्याचे नोकर नव्हेत कीं, ऐकणाऱ्याची लहर लागेल त्या वेळींच त्यांनीं सांगावें. याशिवाय ' कृष्णस्तु भगवान् स्वयम्' अशी श्रीकृष्णाविषयीं ऐकणाऱ्याच्या ठिकाणीं श्रद्धा पाहिजे. कारण गीता सांगणारे श्रीकृष्ण, केवळ वसुदेवपुत्र म्हणजे मनुष्यजन्मा नसून ते साक्षात् मूळ, अनादि, अव्याकृत, सद्‌रूप, ब्रह्मच होत. तेव्हां प्रस्तुत श्लोकांत परोक्षतः सांगितलेले चार गुण संपादन करून जो गीताशास्त्राचा अभ्यास करील त्याला आत्मस्वरूपाची प्राप्ति होईल व विपुल अशा आत्मानंदांतच तो सर्वदा लीन होऊन राहील. तेव्हां प्रत्येकानें हे चार गुण संपादन करून घेणें आवश्य आहे. आपआपल्या वाट्यांला आलेलें कर्म ईश्वरार्पणबुद्धीनें करणें हें मोठें तप आहे. ह्या तपाचें नित्यशः आचरण करून जो गीताशास्त्राचा अभ्यास करील, तो अंतीं मोक्षरूप शांतीला निःसंशय प्राप्त होईल.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

# २

' यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ ' गीता १८-७८.

प्रस्तुत प्रवचनाचा श्लोक हा गीतेच्या अठराव्या अध्यायांतील ७८ वा आहे. ह्याच्या पुढें गीताच नाहीं. असा हा गीताग्रंथाचा शेवटचा श्लोक आहे. गीताग्रंथाचा प्रारंभ धृतराष्ट्रानें संजयाला विचारलेल्या प्रश्नानें झाला आहे (' धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः । मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ ' गीता १–१ ) व गीताग्रंथाचा शेवट संजयाच्या उत्तरांत म्हणजे प्रस्तुत श्लोकांत झाला आहे. हा जसा गीताग्रंथांचा अंतिम श्लोक आहे, तसाच तो अत्यंत महत्त्वाचाहि आहे. या श्लोकाचें महत्त्व काय आहे ? या श्लोकावर ज्ञानेश्वरमहाराजांनीं काय लिहिलें आहे इत्यादि सांगण्यापूर्वी मी प्रथमतः या श्लोकाचा आपणांस धांवता भावार्थ सांगतों. तो असा—

संजय म्हणाला, ' ( इति ) मे मतिः ' म्ह० ' असें माझें मत आहे, असा माझा निश्चय आहे, अशी माझी दृढ समजूत आहे. ' संजयाला आपलें मत कां सांगावें लागलें, याची स्पष्टता मी पुढें

करीनच. कारण अडाणी माणसें जशीं न विचारतां बोलत असतात व नको तितकें बोलत असतात, तसा प्रकार कांहीं शहाण्या माणसांच्या बाबतींत नसतो. तीं विचारल्याखेरीज बोलतच नाहींत. विचारल्याशिवाय सांगूं नये असा शास्त्राचा दंडक आहे ( ' नापृष्टः कस्यचित् ब्रूयात् ' ). संजय या श्लोकांत आपलें मत सांगतो काय मत सांगतो ? तर ' यत्र ' म्ह० ' जेथें अर्थात् ज्या पक्षाला-बाजूला ' ' योगेश्वरः कृष्णः ' म्ह० ' योगयोगेश्वर भगवान् श्रीकृष्ण आहेत ' व ' यत्र पार्थो धनुर्धरः ' ह्म० ' ज्या बाजूला गांडीव धनुष्यधारी अर्जुन आहे ' ' तत्र ' म्ह० ' त्या ठिकाणीं अर्थात् त्या बाजूला ' ' श्रीः ' म्ह० राज्यलक्ष्मी अर्थात् संपत्ति ' विजयः ' म्ह० ' शत्रूपराभव अर्थात् जय ' ' भूतिः ' म्ह० ' भरभराट, समृद्धि अर्थात् सर्व प्रकारचें ऐश्वर्य ' व ध्रुवा नितिः म्ह० ' शाश्वत अर्थात अभंग स्वरूपाची नीति–न्याय कल्याण ' हीं असावयाचींच, असें माझें मत आहे. तात्पर्य, पांडवांच्या बाजूला योगेश्वर भगवान् श्रीकृष्ण व महायोद्धा अर्जुन असल्यामुळें सर्व प्रकारचें यश व कल्याण त्यांच्या बाजूलाच असणार व म्हणून कौरवांना मुळीच यश प्राप्त होणार नाहीं, असा संजयाच्या बोलण्याचा इत्यर्थ आहे.

प्रस्तुत श्लोकाचा विचार प्रत्येकानें करणें अवश्य आहे. कारण या श्लोकांत ज्या गोष्टी सांगितलेल्या आहेत, त्या प्रत्येकाला अपेक्षणीय अशाच आहेत. जगतांत असा कोण मनुष्य आहे कीं ज्याला पैसा, यश, ऐश्वर्य इत्यादि गोष्टी नको आहेत. लोक दरमहा दर शेंकडा एक टक्का ( रुपया ) व्याज मिळत असेल तर आपला जीवहि धोक्यांत घालून दुसऱ्याला कर्जाऊ पैसे देत असतात. आपण कोणाला पैसा देत आहोंत, ह्याचाहि ते विचार करीत नाहींत ( ' जे एकोत्तरेचिया वाढी । जळतिये आगीं घालिती उडी । ' ज्ञा. ९–५४ ). तेव्हां पैसा हा सर्वांना प्रिय आहे. त्याचप्रमाणें जगतांत नीतीलाहि महत्त्व आहे. जगतांत खोटें पचविण्याकरितांहि त्याला नीतीचाच पेहराव द्यावा लागतो,

त्याशिवाय जगतांत खोटेंहि चालत नाहीं. तेव्हां शाश्वत कल्याण, ऐश्वर्य, यश इत्यादिकांचें वास्तव्य कोणाच्या ठिकाणीं असतें, ह्यासंबंधींचा विचार प्रतुत श्लोकात ग्रथित केलेला असल्यामुळें या श्लोकाचें महत्त्व अनन्यसाधारण आहे.

आतां प्रस्तुत श्लोकांत जो सिद्धांत सांगितलेला आहे, तो सांगणारा कोण आहे म्हणजे त्याचा अधिकार काय आहे, ह्याचाहि विचार करणें अवश्य आहे. कारण सांगितलेल्या सिद्धांताचें प्रामाण्य, सांगणारा जो असतो त्याच्या अधिकारावर म्हणजे योग्यतेवर अवलंबून असतें. सांगणारा जर सहीनिशाणी अंगठा या सदरांतील असेल म्हणजे अशिक्षित अथवा अडाणी असेल तर त्याच्या सांगण्याला कांहींहि किंमत नसते. तेव्हां संजयाचा अधिकार काय होता, हें पाहाणें जरूर आहे.

गीतेंत आपल्याला दोन जोड्या दिसून येतात. एक भगवान् श्रीकृष्ण व अर्जुन अशी गुरुशिष्यांची जोडी व दुसरी धृतराष्ट्र व संजय अशी स्वामी–सेवकांची जोडी. मूळ गीताग्रंथ म्हणजे अर्जुन व भगवान् श्रीकृष्ण यांच्यांतील युद्धापूर्वीं झालेला मोकळा संवाद होय. हा गीताख्य नांवाचा संवाद संजयानें धृतराष्ट्राला युद्धवृत्तांबरोबरच निवेदन केलेला आहे. तेव्हां संजयाची भूमिका, अलीकडच्या शब्दांत सांगावयाची तर ती रिपोर्टरची म्हणजे बातमीदाराची अथवा अनुवादकाची होती. यासंबंधीचा कथाभाग थोडक्यांत असा आहे–

धृतराष्ट्र हा जन्मांध होता. म्हणून त्यास कुरूक्षेत्रावर जाऊन कौरव पांडवांचें युद्ध प्रत्यक्ष डोळ्यांनीं पहाणें शक्य नव्हतें. तेव्हां महामुनी व्यास, युद्धापूर्वीं त्याच्याकडे आले व त्याला म्हणाले, " युद्ध पहाण्याची तुझी इच्छा असल्यास मी तुला दिव्य दृष्टि देतों. " परंतु धृतराष्ट्र म्हणाला, " माझा सर्व जन्म आंधळेपणांत गेला व आतां म्हातारपणीं माझ्या कुलाचा क्षय पहाण्यास दृष्टि घेऊन मला काय करावयाचें आहे ? " मग श्रीव्यासांनीं धृतराष्ट्राच्या

घरीं घोड्यांची परीक्षा करण्याकरितां ठेवलेल्या संजयावर अनुग्रह करून त्यास बसल्या जागींच कुरुक्षेत्रावरील युद्धांत घडणाऱ्या सर्व गोष्टींचें ज्ञान प्रत्यक्ष व्हावें अशी दिव्यदृष्टि दिली व त्यास धृतराष्ट्रा-जवळ हस्तिनापुरांतच बसविलें आणि कुरुक्षेत्रावरील सर्व इत्थंभूत हकीगत धृतराष्ट्रास सांगण्यास त्यास आज्ञा देऊन व्यास निघून गेले. नंतर व्यासांच्या कृपेनें दूरश्रवण व दूरदर्शन प्राप्त झालेल्या संजयानें हस्तिनापुरांतील धृतराष्ट्राच्या घरींच राहून त्यास त्याच्या प्रश्ना-वरून कुरुक्षेत्रावर जसजशी हकीगत झाली, तसतशी निवेदन केली. हल्लीं जसें प्रकाशवाणीनें ( टेलेविझननें ) व आकाशवाणीनें वाटेल तेवढ्या अंतरावरचें दिसूं शकतें व ऐकूं येतें तद्वतच व्यासांच्या कृपेनें संजयाला बसल्या जागींच कुरुक्षेत्रावरील सर्व दिसत होतें व ऐकूं येत होतें व तो तें सर्व धृतराष्ट्राला सांगत होता. तेव्हा संजय हा अनुवादक आहे.

आतां गीताशास्त्र जें निर्माण झालें तें कांहीं संजयाकरितां नव्हे; तें अर्जुनाकरितांच निर्माण झालें. खुद्द संजयानें याबाबतींत पुढील-प्रमाणें म्हटलें आहे. तो म्हणतो, " हें गीताख्यरूपी पक्वान्न भगवंतांनीं मूळ अर्जुनाच्या ताटांत वाढण्यासाठीं तयार केलें, परंतु अर्जुन जेवत असतां आम्ही त्याच्या घरीं आयतेच पाहुणे जाऊन उतरलों ! मग काय ! आम्हांसहि अनायासें त्या पक्वान्नाचा लाभ झाला आणि आमची चंगळ उडाली ! हें आमचें थोर भाग्यच ! ( ' सहजें ब्रह्मरसाचें पारणें। केलें अर्जुनालागीं नारायणें। कीं तेचि अवसरीं पाहुणें। पातलों आम्हीं ॥ कैसी दैवाची थोरी नेणिजे। ' ज्ञा. ६–२, ३.

तेव्हां गीता संजयानें सांगितलेली नाहीं, तर ती भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनाला सांगितलेली आहे व संजय हा नुसता रिपोर्टर ( म्ह० निवेदन करणारा ) आहे. म्हणून गीतेंतील मुख्य भाग म्हणजे भगवान श्रीकृष्ण वक्ता व अर्जुन शिष्य श्रोता. तेव्हां गीतेंत श्रीकृष्ण व अर्जुन ह्या जोडीला प्राधान्य आहे आणि धृतराष्ट्र व संजय ही जोडी उपांगभूत

अथवा गौण आहे. भगवान् श्रीकृष्ण म्हणजे साक्षात् पूर्णावतार होत व भक्त अर्जुन हा नराचा अवतार होता. तेव्हां दैवी गुरु व दैवी शिष्य अशी ही कृष्णार्जुन गुरुशिष्यांची अद्वितीय जोडी होती. त्यांचें वर्णन ज्ञानेश्वरमहाराजांनीं 'तो नर तैसा नारायण' (ज्ञा. १३–११४५) या शब्दांत केलें आहे. ह्याच्या उलट धृतराष्ट्र व संजय ह्या जोडीचा जर आपण विचार केला तर, 'कुठें संजय व कुठें धृतराष्ट्र'! या दोहोंमध्यें महदंतर आहे. धृतराष्ट्र हा अगदीं बहिर्मुख होता. त्याच्या मनावर गीताख्य संवाद ऐकून कांहींच परिणाम होत नव्हता व म्हणून ज्ञानेश्वरमहाराजांनीं त्याला एके ठिकाणी रेड्याची उपमा दिली आहे. रेडा ज्याप्रमाणें मोटारीचा हॉर्न वाजविला तरी मानहि वर करीत नाहीं किंवा पूर आला तरी पाण्यांतून उठत नाही; त्याप्रमाणें भगवंतासारखा बोलणारा ('आधींचि विवेकांची गोठी। वरी प्रतिपादी श्रीकृष्ण जगजेठी।' ज्ञा. ४–२) व भगवंताच्या मुखांतून ब्रह्मज्ञानरूपी अमृताचा सारखा वर्षाव चाललेला असतांनाहि तें सर्व ऐकून धृतराष्ट्र म्हैशासारखा अगदीं स्वस्थच बसला होता.

('अहो ऐकिजत असें कीं अवधारा। तंव इया बोला निवांत म्हातारा। जैसा म्हैसा नुठी कां पुरा। तैसा उगाचि असे॥' ज्ञा. ९–५२२). संजय मात्र जरी घोड्याचा खरारा करणारा सूत होता तरी गीता ऐकण्यास तो सत्त्वसंपन्न असा योग्य अधिकारी होता. भगवान् गीता सांगत असतांना अर्जुनावर जो परिणाम होत होता, तोच परिणाम संजयावरहि होत होता. त्याच्या अंगावर अधूनमधून अष्टसात्त्विकभाव उत्पन्न होत व यामुळें धृतराष्ट्राला वृत्तांत सांगत असतांना त्याचा कंठ दाटून येत असे. तेव्हां तो नुसता अरसिक रिपोर्टर किंवा जड ध्वनिक्षेपक यंत्र नव्हता. नाहींतर कांहीं श्रोते धृतराष्ट्रासारखे असतात कीं, वक्त्यानें कितीहि जरी उत्कृष्ट व्याख्यान दिलें तरी ते खांबासारखे निर्विकार असतात. त्यांच्यावर त्याचा कांहींहि परिणाम होत

नाहीं. संजय हा साधक होता, बुद्धिमान होता, रसिक होता, व अध्यात्म ऐकण्यास योग्य अधिकारी होता. संजयाची अशी पात्रता पाहूनच व्यासांनीं त्याला दिव्यदृष्टि दिली व त्याची अनुवादक म्हणून निवड केली. तेव्हां गीतेंत भगवंताच्या उक्तीला पहिल्या प्रकारचें प्राधान्य आहे व त्याच्या खालोखाल अनुक्रमें अर्जुनाच्या उक्तीला व व्यासशिष्य संजयाच्या उक्तीला आहे. धृतराष्ट्राच्या उक्तीला मात्र अध्यात्मशास्त्र-दृष्ट्या कांहींच किंमत नाहीं कारण तो या बाबतींत पूर्णतः अन-धिकारी होता.

भगवंताच्या खालोखाल ज्ञानाच्या व बुद्धीच्या बाबतीत समर्थ म्हणून महामुनि व्यासांची गणना केली जाते. कृष्णद्वैपायन व्यासांचा अधिकार फार थोर होता. ते म्हणजे प्रत्यक्ष नारायणच होत असें पुराणांतून वर्णन केलें आहे. ( कृष्णद्वैपायनं व्यासं विद्धि नारायणं प्रभुम् ' विष्णुपुराण ३-४५; ' अचतुर्वदनो ब्रह्मा द्विबाहुरपरो हरिः। अभाललोचनः शंभुर्भ-गवान्बादरायणः ॥ ' ). श्रीमद् व्यासांची प्रतिभा फार विशाल होती. ( ' नमोऽस्तुते व्यास विशालबुद्धे फुल्लारविंदायतपत्रनेत्र। येन त्वया भार-ततैलपूर्णः प्रज्वालितो ज्ञानमयः प्रदीपः ' ). भगवान श्रीकृष्ण व अर्जुन यांच्यांत जो गीताख्य नांवाचा मोकळा संवाद झाला तो महामुनि व्यासांनीं भारतांतील भीष्मपर्वांत अनुष्टुप छंदांत ग्रथित केला व म्हणून तो पद्यप्रबंध झाला. ( ' पार्थाय प्रतिबोधितां भगवता नारायणेन स्वयं। व्यासेन ग्रथितां पुराणमुनिना मध्ये महाभारतम् ॥ ' ). तेव्हां आपणांपुढें जी गीता आज आहे ती भगवान श्रीबादरायण व्यासांनीं रचलेली आहे. अर्जुन हा एक शीघ्र कवि होता व म्हणून तो भगवंताला प्रश्न श्लोकांत विचारी व भगवंत त्याचें उत्तर श्लोकांत देत असे, असें मुळींच नाहीं. श्रीकृष्ण व अर्जुन यांच्यांत अगदीं थोडक्यांत झालेला संवाद, सर्वांना आकलन व्हावा म्हणून व्यासांनीं श्लोक रचून भारतांत तो विस्तृत रीतीनें मांडलेला आहे व म्हणूनच त्यांत पुनरुक्ति आहे.

शास्त्रांतील सिद्धान्त सामान्य जनांच्याहि गळीं उतरावेत म्हणून तेच वेगवेगळ्या प्रक्रियांनीं सांगितले जातात व त्यामुळें शास्त्रीय ग्रंथांत झालेल्या पुनरुक्तीची गणना दोषांत केली जात नाहीं. ज्यांनीं शिक्षकाचा धंदा केला आहे त्यांना माहीत आहे कीं, जसे चिरंजीव व कन्या मिळतील ज्या प्रकारचे विद्यार्थी व विद्यार्थीनी मिळतील त्यावर एकच गोष्ट किती वेळां सांगावयाची हें अवलंबून असतें. एखादा विद्यार्थी असा भेटतो कीं, विद्येची इमारत उंच बांधावयाची म्हणून तो खालच्या इयत्तेंतच पाया भक्कम करीत राहतो म्हणजे नापास होत असतो. अशा विद्यार्थ्याला कितीं वेळां सांगावयाचें तर त्याला तें समजेपर्यंत सांगावें लागतें. तद्वत-तच गीतेतील अध्यात्म सर्वांना समजावें म्हणून त्यांत पुनरुक्ति आहे. भगवंताच्या भाषणाचें रहस्य अर्जुनाला कळलें, त्याच्या खालोखाल व्यासांना कळलें व व्यासांच्या कृपेनें तें संजयासहि कळलें. तें भाषण धृतराष्ट्राला मात्र समजलें नाहीं. गंगेचें अर्थात नदीचें पाणी शेतांत न्यावयाचें असेल तर काल्वा काढून त्याचा पाट शेतांत न्यावा लागतो. तद्वतच भगवान श्रीकृष्ण व अर्जुन ह्यांच्यांतील गुह्य व कठीण असें मोकळें भाषण श्रीव्यासांनीं अठरा अध्यायात्मक अशा गीताग्रंथानें आणलें. तद्द्वारां तें तळहातांत घेतां येईल इतकें त्यांनीं आबालसुबोध केलें व अशा रीतीनें त्यांनीं जगतावर हा मोठा उपकारच केला आहे असें श्रीज्ञानेशांनीं या बाबतींत म्हटलें आहे [ ' आणि कृष्णार्जुनीं मोकळी । गोठी चावळिली जे निराळी । ते श्रीव्यासे केली करतळीं । घेवों ये ऐसी ॥ म्हणौनि श्रीव्यासाचा हा थोरु । विश्वासि जाला उपकारु । जे श्रीकृष्णउक्ती आकारु । ग्रंथाचा केला ॥ ' ज्ञा. १८–१६९६, १७०७ ].

ज्ञानेश्वरमहाराज श्रीव्यासांना फार मोठे समजत होते. त्यांनीं आपल्या वाङ्मयीन गणपतीला वेढण्यास समर्थ असणाऱ्या अशा श्रीव्यासांच्या विशाल बुद्धीवर मेखलेचें रुपक ज्ञानेश्वरीच्या प्रारंभीच्या नमनांत केलें ( ' तेथ व्यासादिकांचिया मती ॥

तेंचि मेखळा मिरवती । ' ज्ञा. १–९ ). गीतेवर मी टीका लिहिण्याचा प्रयत्न करणें म्हणजे चोचीनें समुद्राचें माप करूं पाहणाऱ्या टिटवीप्रमाणेंच होय, असें जरी ज्ञानेश्वरमहाराजांनीं आपल्या बाबतींत म्हटले आहे ( की, टिटिभू चांचूवरी । माप सूये सागरीं । मी नेणतु त्यापरी । प्रवर्ते येथ ॥ ' ज्ञा. १–६८ ) तरी आपणांस व्यासांचा आधार असल्यामुळें आपण या अपार गीतातत्त्वाचें व्याख्यान करूं शकूं असाहि आत्मविश्वास त्यांनीं प्रकट केला आहे. ते म्हणतात, ज्याप्रमाणें वडिलांच्या बरोबर त्यांच्या लहान मुलाला जर एखाद्यानें आपल्या घरीं बोलविलें तर तो लहान मुलगा, वडिलांच्या मागोमाग, त्यांच्या पावलावर पावलें टाकीत जसा त्या घरीं निश्चित जाऊन पोहचतो; त्याप्रमाणें माझा अधिकार जरी नसला, तरी मी व्यासांच्या अनुरोधानें चालत असल्यामुळें गीतेच्या तात्पर्य निर्णयाचे बाबतींत मी बरोबर असेन यांत मला मुळीच शंका नाहीं (' आणि बापु पुढां जाये । ते घेत पाऊलाची सोये । बाळ ये तरी न लाहे । पावों कायी ॥ तैसा व्यासाचा मागोवा घेतु । भाष्यकारांतें वाट पुसुतु । अयोग्यहि मी न पवतु । कें जाईन ॥ ज्ञा. १८–१८२१–२२ )." अशा व्यासाचा संजय हा अनुग्रहित होता. व्यासांच्या कृपेनें त्याला अद्‌भुत शक्ति प्राप्त झाली होती.

त्रिवेणी संगमांत जशा गंगा, यमुना ह्या प्रत्यक्ष दिसतात, पण त्यांत सरस्वती जशी गुप्त आहे. त्याप्रमाणें संजयाच्या पोटांत व्यास येतात. तेव्हां संजय जें बोलतों तें व्यासांचेंच बोलणें होय. खुद्द संजय धृतराष्ट्राला म्हणतो, " जर तुमचा व्यासांच्या बोलण्यावर खरोखरीचा विश्वास असेल तर ' येथें भगवान् श्रीकृष्ण आहे व जेथें धनुर्धर पार्थ आहे, तेथें विजय आणि शाश्वत नीति आहे '; हा माझा सिद्धान्त तुम्ही अढळ माना. त्यांत जर अन्यथा होईल तर मी मला व्यासांचा शिष्य म्हणवून घेणार नाहीं (' जरी व्यासाचेनि साचें । धिरे मन तुमचें । तरी या बोलाचें । ध्रुवचि माना ॥ ' ज्ञा० १८–१६५६–५८ ). यावरून प्रस्तुत श्लोकांत

जो सिद्धान्त ग्रथित केलेला आहे तो खुद्द व्यासांचा ठरतो व म्हणून तों अभंग आहे. ह्या श्लोकाचें महत्त्व सांगतांना ज्ञानेश्वरमहाराजांनीं असे म्हटलें आहे कीं, ' व्यासांचा शिष्य जो संजय, त्याचा हा श्लोक पूर्णोद्गार असून त्यांत गीतेच्या सातशे श्लोकांचेंहि तात्पर्य ग्रथित केलें आहे. तेव्हां हा एकच श्लोक जो हृदयापाशीं धरून राहील, त्यानें संपूर्ण विद्यामात्राचें खरें स्वरूप हस्तगत केलें म्हणून समजावें. ( ' तैसें शब्दब्रह्म अनंत । जालें सवालक्ष भारत । भारताचें शतें सात । सर्वस्व गीता ॥ तयाहि सातां शतांचा । इत्यर्थु हा श्लोक शेषींचा । व्यासशिष्य संजयाचा । पूर्णोद्गारू जो ॥ येणें येकेंचि श्लोकें । राहे तेणें असकें । विद्याजाताचें निकें । जिंतिलें होय ॥ ' ज्ञा० १८–१६६१ –६३ ). तेव्हां गीतेचें तात्पर्य व्यासांनीं ज्या श्लोकांत काढलें आहे, तो हा श्लोक आहे व म्हणून तो चिंत्य आहे.

जीवाचें खरें शाश्वत कल्याण कशांत आहे तें सांगणारा हा श्लोक आहे. गीतेंत खरी नीति आहे. गीतेंतील श्री, विजय, नीति हीं सर्व आत्मज्ञानाला नेऊन पोहोचविणारीं आहेत. ज्या गीताग्रंथाचें सारसर्वस्व प्रस्तुत श्लोकांत ग्रथित केलें आहे, तो गीताग्रंथ केवळ निवृत्तीपर आहे व मेल्यानंतर मोक्ष देणारा आहे, अशी बहुतेक लोकांची समजूत असते. गीता हें अध्यात्मशास्त्र असल्यामुळें सामान्यतः या ग्रंथाचें वाचन जे विश्रामधाममंडळाचे सभासद झाले आहेत म्हणजे जे वृद्ध झाले आहेत, ज्यांना जगतांत फारसें काम शिल्लक राहिलें नाहीं ते किंवा विगतधवा अशा ज्या स्त्रिया आहेत त्या, करीत असतात. ह्याचें कारण लोकांना जीवन काय व अध्यात्म काय हें समजत नाहीं. प्रपंच व अध्यात्म हीं एकामागून एक येणारीं अशी स्वतंत्र दोन दालनें आहेत असें लोकांना वाटतें, पण तें खरें नाहीं. गीता हें जीवनाचें शास्त्र आहे. उत्कृष्ट जीवन कसें घालवावें हें गीतेंत सांगितलें आहे. आपण उत्तम डॉक्टर व उत्तम इंजिनिअर जरी झालांत तरी उत्तम मनुष्य होणें, हें महत्त्वाचे आहे. गीता हें

शिकविते. गीता हा अध्यात्मप्रधान नीतिशास्त्राचा ग्रंथ आहे व तो जीवाला शोकमोहातीत करून अखंड आत्मानंद प्राप्त करून देणारा आहे. ही गोष्ट भगवंताला अर्जुनाला गीताशास्त्र कां सांगावें लागलें ह्याचा आपण विचार केल्यास आपणांस कळून येईल.

वास्तविक अर्जुन युद्धाच्या तयारीनेंच रणांगणावर आला होता. परंतु रणांगणावर आल्यानंतर त्याला जें दृश्य दिसूं नये तें दिसलें. वास्तविक व्यासांनीं म्हणावयास पाहिजे होतें कीं, अर्जुनाला रणांगणावर आल्यानंतर तेथें त्याला भीष्म, द्रोण व इतर शत्रु दिसले. परंतु त्यांनीं तसें म्हटलें नाहीं. मोठी मौज आहे कीं, पितृपंधरवड्यांत पक्षाच्या दिवशीं जसें सर्व नातेवाईकांचें स्मरण होतें तशीच अर्जुनाची स्थिति झाली. त्याला काय दिसलें, ही गोष्ट व्यासांनीं पुढीलप्रमाणें सांगितली आहे–' तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् । आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥ श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि । तान्समीक्ष्य स कौन्तेयः सर्वान्बंधूनवस्थितान् ॥ ' ( गीता १–२६–२७ ). ह्याचा परिणाम असा झाला कीं, अर्जुनाच्या अंतःकरणांतील शूरवृत्ति नष्ट झाली व तिच्या ऐवजीं करुणावृत्ति उत्पन्न झाली अर्जुन हा शोकानें व मोहानें व्याप्त झाला.

गीता ही कर्तव्याच्या आड येणारे जे शोक व मोह यांच्या निवृत्तीकरतां सांगितलेली आहे. ती ऐकून आपल्या ठिकाणचा शोक व मोह संपूर्णतः नष्ट झाला आहे, ह्याची कबूलीहि अर्जुनानें ' नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा ' ( गीता १८–७३ ) या श्लोकांत दिली आहे. शोकाचा परिणाम काय होतो हें जितकें सांगावें तितकें थोडेंच आहे. एकच उदाहरण द्यावयाचें तर, फ्रेंच राज्यक्रान्ती जी झाली, त्या वेळीं राजा व राणी यांना फांशीची शिक्षा देण्यांत आली. त्या प्रसंगाचें वर्णन एडमन्ड बर्क यानें केलेलें आहे. त्यांत तो म्हणतो कीं, शिक्षा ऐकल्यानंतर राणी जी

होती तिचे केस एका रात्रींत काळयाचे पांढरे झाले. हें ऐतिहासिक सत्य आहे व यावरून शोक किती दुःसह असतो ह्याची कल्पना येते. गीताशास्त्राच्या अध्ययनानें अध्यात्मज्ञानाची प्राप्ति होते व तद्द्वारां शोकमोहाची आत्यन्तिक निवृत्ति होऊन जीवाला शाश्वत शांति, सुख व समाधानता प्राप्त होते ( ' ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ॥ ' गीता ४–३९ ). अशा या अलौकिक गीताग्रंथाचा निष्कर्ष श्रीव्यासांनीं प्रस्तुत एका श्लोकांत आणला आहे व त्यांत संजयद्वारां व्यासांनीं ऐहिक ऐश्वर्य व शाश्वत सुख हीं कोठें नांदतात या बाबतींतील आपलें निश्चित मत सांगितलें आहे, असा हा महत्वाचा श्लोक आहे.

प्रस्तुत श्लोकाची मांडणीच अशी आहे कीं, संजय म्हणतो, " असें माझें मत आहे " ( ' इति मे मतिः ). त्याअर्थीं त्याला कोणी तरी त्याचें मत विचारलें असलें पाहिजे. कारण मागें सांगितल्याप्रमाणें शहाणी माणसें हीं विचारल्याखेरीज उगाच बोलत नसतात. म्हणून ज्ञानेश्वरमहाराजांनीं प्रस्तुत श्लोकांतील ' मे मतिः ' या पदांचा आधार घेऊन ह्याच्या मागचा जो श्लोक ' तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्‍भुतं हरेः ' ( गीता १८–७७ ) त्या श्लोकाशीं प्रस्तुत श्लोकाची संगति उत्कृष्ट रीतीनें लावली आहे. ज्ञानेश्वरमहाराजांचें हें एक वैशिष्टय आहे कीं, ते श्लोकसंगति स्वतंत्रपणानें लावतात. ते जरी विनयानें ' एऱ्हवीं तरी मी मूर्खु । जरी जाहला अविवेकु ' ( ज्ञा. १–७६ ) असें म्हणत असले तरी वस्तुतः त्यांचे ठिकाणीं अप्रतिहत कवित्वशैली होती. त्यांची प्रतिभा फार दांडगी ज्ञानेश्वरी म्हणजे कांहीं श्रीशंकराचार्यांच्या गीताभाष्याचें मराठींतील भाषांतर नव्हें. ज्ञानेश्वरमहाराज स्वतंत्रप्रज्ञ होते. ' तें देवाचें मनोगत । दावित आहासी तूं मूर्त ' ( ज्ञा. १३–८५६ ) असे संतश्रोत्यांनीं त्यांच्याबद्दल प्रशंसोद्गार काढले आहेत. ज्ञानेश्वरींत उत्कृष्ट काव्य व उत्कृष्ट अध्यात्म हीं जशीं आहेत त्याचबरोबर गीतातात्पर्यकथनाला रमणीयता यावी एवढ्याकरितां ज्ञानेश्वर-

महाराजांनीं ज्ञानेश्वरीत ठिकठिकाणीं संवाद आणले आहेत. आतां संजय आपलें मत कोणाला सांगणार! तो आपलें मत भगवंतालाहि सांगू शकत नाहीं व अर्जुनालाहि सांगूं शकत नाहीं. त्याच्यासमोर एकटा धृतराष्ट्रच बसला होता. म्हणून ज्ञानेश्वरमहाराजांनीं श्लोकसंगति लावण्याकरितां या ठिकाणीं धृतराष्ट्राला आणलें आहे व धृतराष्ट्र व संजय यांच्यातील संवाद फार बहारीचा रचला आहे. धृतराष्ट्र हा पुत्रमोहनें ग्रासल्यामुळें त्याच्यावर श्रीकृष्णार्जुनाच्या गीताख्य संवादाचा तसा कांहींच परिनाम झाला नाहीं, व संजय मात्र तो संवाद ऐकून कसा हर्षभरित झाला याचें चित्र ज्ञानेश्वरमहाराजांनीं फारच उत्तम रेखाटलें आहे. यामुळें त्यांच्या श्लोकसंगतिकथनाला चांगलाच उठाव आला आहे.

अर्जुनाचें बोलणें ' नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत ' (गीता १८–७३) या श्लोकांत संपलें व त्या ठिकाणीं गीताहि संपली. कारण अर्जुनानें भगवंताला आपल्या ठिकाणचा मोह संपूर्णतः नष्ट झाला व आतां मी तुझ्याच म्हणण्याप्रमाणें वागेन (' करिष्ये वचनं तव ') असें सांगितलें. यामुळें ज्या कारणाकरितां भगवंतानीं अर्जुनाला गीतोपदेश केला, तें कार्य सफलित झाल्यामुळें भगवंताचेंहि बोलणें थांबलें. परंतु तो गीताख्य संवाद ऐकून संजयाची जीवदशा नष्ट झाली होती. बर्फाचा खडा हातांत धरल्यावर तो जसा हळूहळू वितळून जातो, त्याप्रमाणें संजयाचें देहभान तो संवाद ऐकत असतांना हळूहळू नष्ट होत चाललें होतें व शेवटीं तो ब्रह्मानंदांत विरून गेला. त्याचें देहतादात्म्य संपूर्णतः नष्ट झालें. तो जोंपर्यंत देहतादात्म्यावर राहून बोलत होता तोपर्यंत धृतराष्ट्र संजयाची भाषा कांहींतरी जाणूं शकत होता. शिवाय भगवंताचें बोलणें जेथें संपलें, त्या ठिकाणीं वास्तविक संजयाचें अनुवादकाचेंहि काम संपावें; परंतु संजयाचें बोलणें चालूंच राहिलें. त्याचें बोलणें थांबेनाच! ' राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिमम्द्भुतम् । केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ ' (गीता

१८–७६ ) तो पुन्हः पुन्हा तेंच तेंच सांगूं लागला. या अवस्थेंवर गेल्यानंतर दुसरें बोलणें तरी होईल कसें ? सर्व आनंदच आनंद ! त्या आनंदातिशयांत तो वारंवार ' श्रीकृष्ण श्रीकृष्ण ' असेंच म्हणत राहिला. ' तेथ असंवरें आनंदें । अलौकिकही कांहीं स्फुंदे । श्रीकृष्ण म्हणे सद्गदें । वेळोवेळां ॥ ' ( ज्ञा. १८–१६२० ).

संजय कोणत्या अवस्थेंत आहे, हें समजण्याची धृतराष्ट्राची पात्रताच नव्हती. तो आत्मानंदाच्या उन्मादांत होता ( एवंव्रतः स्वप्रियनामकीर्त्या जातानुरागो द्रुतचित्त उच्चैः । हसत्याथो रोदिति रौति गायत्युन्मादवन्नृत्यति लोकबाह्यः । ए. भा. २–४० ) धृतराष्ट्रांला कांहीं कळेनाच ! हा हंसतो काय ? मधूनमधून उभा राहतो काय ? बोलतो काय ? इत्यादि. वास्तविक मूळ गीता ऐकतांनाच धृतराष्ट्र अगदीं कंटाळून गेला होता. त्यानें मध्येंच तोंड घातलें असतें. परंतु पूर्व संस्कार चांगले होते म्हणूनच त्यानें गीता तरी अथ पासून इतिपर्यंत ऐकून घेतली. परंतु संजय जेव्हां ' हरीचें अत्यद्भुत विश्वस्वरूप माझ्या स्मरणांत वारंवार येत असल्यामुळें मला पुनः पुनः हर्ष होत आहे ' असें सांगू लागला ( ' तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः । विस्मयो मे महान्राजन्हृष्यामि च पुनः पुनः ॥ ' ( गीता १८–७७ ), तेव्हां तें त्याला कांहीं उमगेना : बरें, प्रत्यक्ष डोळयांनीं कांहीं पहावें तर तो जन्मांध होता. तो जसा बाहेरून चर्मचक्षूनीं आंधळा होता त्याप्रमाणें अंतःकरणांतहि ज्ञानचक्षूनीं आंधळा होता. ( ' हा जीवें धाडसा आहे मी म्हणें । तंव आंतुहि आंधळा ॥ ' ज्ञा. १०–३२९ ). तेव्हां हें काय गारुड आहे ह्याचा त्याला कांहीं उलगडाच होईना. शिवाय संजय जोंपर्यंत देह तादात्म्यावर होता, तोपर्यंत तो संवादाच्या स्थितींत होता व त्यामुळें कांहीं कालानंतर कां होईना, पण त्यांच्या बोलण्याचा शेवट होण्याची शक्यता होती. तो देहभान विवर्जित झाला व प्रश्न न करतांनाच बोलूं लागला. मग त्या बोलण्याला शेवट कोठून होणार !

वास्तविक संजय भगवंताचा आनंद भोगण्यांस नाहींसा झाला होता. पण धृतराष्ट्राला त्याची काय कल्पना येणार? परंतु संजय आपणांस आनंद झाला येवढें सांगण्यावरच थांबला नाहीं. तो हर्षाच्या वेगांत उठून उभा राहिला व मर्यादा सोडून एकेरी भाषेंत धृतराष्ट्राला म्हणूं लागला, " राजा! हें श्रीहरीचें विश्वरूप पाहून तुला घुम्यासारखें स्वस्थ कसें बसवतें? ('मग उठोनि म्हणे नृपा। श्रीहरीचिया विश्वरूपा। देखलिया उगा कां पां। असों लाहसी ॥' ज्ञा. १८-१६१६) त्यावर धृतराष्ट्रानें विचार केला कीं, आतां आपल्याला मध्यंतरी बोललें हें पाहिजेच. नाहींतर ही संजयाची वटवट थांबणार नाहीं. मग तो संजयाला म्हणाला, " ए संजया! व्यासांनीं तुला माझ्याजवळ लढाईची हकिगत सांगण्याकरितां बसविलें; तें सोडून तूं हा भलताच प्रकार काय चालविला आहेस? हें अप्रासंगिक भलतेंच काय वडबडत बसला आहेस? ('तेणें तूंतें येथें व्यासें। बैसविलें कासया उद्देशें। अप्रसंगामाजीं ऐसें। बोलसी काई ॥' ज्ञा. १८-१६३२). ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, 'ज्याला ज्याची गोडी समजत नाहीं, त्याला तें बेचव किंवा हिमूळच वाटतें. मग धृतराष्ट्रानें संजयाचें हें मधील बोलणें अप्रसंगिक मानावें हें अगदीं स्वाभाविक होय.' ('जो जेथिंचें गौरव नेणें। तयासि तें भिंगुळवाणें। म्हणौनि अप्रसंगु तेणें। म्हणावा कीं तो ॥' ज्ञा. १८-१६२६). याविषयीं मी आपणांस खरा घडलेला एक मौजेचा प्रसंग सांगतो,

मागें श्री सयाजीराव गायकवाड हयात असतांना त्यांनीं आपल्या लक्ष्मीविलास राजवाड्यामध्यें बालगंधर्वांचें मुद्दाम नाटक ठेवलें होतें. तें पाहण्याचे परवाने अगदीं निवडक अशा लोकांना देण्यांत आले होते. ज्यांना मिळाले होते त्यांपैकींच एकानें आपल्या घरीं आलेल्या पाहुण्याला आपल्याबरोबर तें नाटक पहाण्याकरितां नेलें. हा पाहुणा अगदीं खेडवळ होता व गाण्याच्या बाबतींत पूर्ण अरसिक होता. नाटक जेव्हां ऐन रंगांत आलें, तेव्हां बालगंधर्व 'नाहीं मी बोलत आतां' हा एकच चरण वेगवेगळ्या थाटांत घोळघोळून म्हणत होते.

या पाहुण्यानें बोटें घालण्यास सुरवात केली आणि जेव्हां तो चरण सुमारें पंधरा बेळां म्हटला गेला, तेव्हां हा एकदम मधेंच उठला व म्हणाला, " न का बोलेना ! हा मी चाललो. " असें म्हणून तो बाहेर निघून गेला ! सांगण्याचा आशय असा कीं, ज्याला ज्या विषयाची गोडी नसते त्याला तो विषय ऐकण्याचाच प्रसंग आला कीं, तें, त्याला कंटाळवाणेंच होतें. जो ज्या परिसरांत नसतो, तेथें जर त्याला नेलें तर त्याला कसेंसेंच वाटतें. श्रीरामकृष्ण परमहंस याबाबतींत एक सुंदर दृष्टांत देत.

एका खेडेगांवांतील माळिणी रोज डोक्यावर फुलाच्या पाट्या घेऊन जवळच्या शहरीं फुलें विकण्याकरितां जात असत. एकदां असा एक प्रसंग घडला कीं, त्या फुलें विकून आपल्या गांवीं परत जाण्याकरितां म्हणून निघाल्या. शहर सोडून दीडदोन मैल परतल्या नाहींत, तोंच समोर आभाळ मेघांनीं दाट भरून आलेलें दिसलें. तेव्हां त्या आपापसांत म्हणूं लागल्या कीं, ' आतां पाऊस तर जोराचा पडणार व मग आपण भिजणार; शिवाय सध्यां दिवसहि मोठे खराब आहेत. तेव्हां ही जवळ जी माळ्याची मोठी बाग दिसत आहे, तेथेंच रात्रभर मुक्काम करावा व पहांटे लवकर उठून आपण आपल्या गांवीं निघून जावें. ' असा विचार करून त्या माळिणी त्या बागेच्या तोंडाशींच रस्त्यावर उभ्या राहिल्या. त्यांच्यामागून मासे विकणाऱ्या कांहीं बायाहि शहरांत मासे विकून आपल्यागांवीं परत जाण्याकरितां निघाल्या होत्या, त्याहि त्या ठिकाणीं प्राप्त झाल्या. या माळिणींना पाहून त्या त्यांना म्हणाल्या, " पावसाचा रंग आहे, गांव तर फार दूर आहे, तेव्हां तुमचा येथेंच थांबण्याचा विचार आहे कीं काय ! " त्यावर त्या माळिणी म्हणाल्या, " या बागेचा जो मालक आहे तो आमच्या ओळखीचा आहे, तेव्हां त्यांच्या पडवींत आज रात्रीं राहण्याचा आमचा विचार आहे. " हें ऐकून त्या मासे विकणाऱ्या बाया म्हणाल्या, " मग आमचीहि सोय लावा ना त्याबरोबर

त्यावर माळिणी म्हणाल्या, " पाहूं माळयाला विचारून. " नंतर त्या माळिणी त्या बागेच्या मालकाकडे गेल्या व त्याला म्हणाल्या, " अहो माळीदादा ! मेघांनीं आकाश भरून आलें आहे, तेव्हां पाऊस जोराचा येणार, एवढ्याकरितां आज रात्री आम्हांला तुमच्या पडवींत मुक्काम करूं द्या. " त्यावर माळी म्हणाला, " रहावयास माझी हरकत नाहीं, परंतु तुमच्याबरोबर त्या मासे विकणाऱ्या बाया आहेत ना ! त्यांची घाण नको. " तेव्हां त्या माळिणी म्हणाल्या, " त्या तरी बिचाऱ्या या प्रसंगी कुठें जाणार ! " माळी दयाळू होता. तो त्या मासे विकणाऱ्या बायांना म्हणाला, " तुम्हीसुद्धां मुक्काम करा, माझी हरकत नाहीं. पण तुमच्या ज्या पाट्या आहेत त्या मात्र अंगणांत ठेवा आणि मग पडवींत झोंपा. "

त्या पडवीच्या एका कोपऱ्यांत माळ्यानें दुसऱ्या दिवशीं बाजारांत विकण्यास नेण्याकरितां म्हणून मोतिया, गुलाब, सोनचाफा वगैरे सुवासिक फुलांच्या पाट्या भरून ठेवल्या होत्या. त्यांचा सुगंध सर्व पडवीभर दरवळला होता. त्या माळयानें त्याच पडवीवर त्या सर्वांना झोंपी जाण्याकरिता जागा करून दिली. ज्या माळिणी होत्या त्यांना पडल्यांबरोबर लगेच झोंप लागली. तरंतु ज्या मासे विकणाऱ्या बाया होत्या त्यांना झोंप येईना. फुलांच्या सुवासानें त्यांना गुदमरल्यासारखें होऊं लागलें. कांहीं केल्या त्यांचा डोळा लागेना. शेवटीं एकीनें दुसरीला विचारलें, " काय ग ! झोंप नाहीं कां लागत ? " दुसरी म्हणाली, " होय, मलाच काय ? आपल्यापैकीं कोणालाच येथें झोंप येणें शक्य नाहीं. येथें फुलांचा वास भरून राहिला आहे व त्यामुळें गुदमरल्यासारखें होत आहे. अजून सर्व रात्र जावयाची आहे. तेव्हां झोंप येण्या-करितां काय करावें, हेंच समजत नाहीं. " त्यांच्यापैकीं एक हुषार होती. ती म्हणाली, " मी सांगतें युक्ति तुम्हांला ! तुम्ही आतां असें करा कीं, आपल्या पाट्या ज्या अंगणामध्यें ठेवलेल्या आहेत त्या घेऊन या. त्या ठेवा आपल्या उशाशीं. सर्व माळिणींना गाढ

झोंप लागली आहे तेव्हां त्यांना हें कळणार नाहीं. बरें, सकाळीं उठल्यावर जर माळ्याला हें कळलें, तर तो फार तर पुन्हां आपल्याला येथें उतरावयास जागा देणार नाहीं. परंतु आपल्याला पुन्हां कशाला याच्या घरीं यावयाचें आहे ? सकाळीं लवकर उठून आपण आपल्या गांवाचा रस्ता धरूं म्हणजे झालें ! " त्यानंतर त्यांनीं त्या पाट्या आपल्या उशाशीं ठेवल्या मग त्यांना झोंप लागली. सांगण्याचा भावार्थ असा कीं, त्या मासे विकणाऱ्या बायांना सुवासिक फुलांचा सुगंध अप्रसंगच वाटला. तसेंच नित्य तमाशा पाहणाऱ्या माणसाला जर कीर्तनांत आणून बसविलें तर त्याला करमणारच नाहीं. तो म्हणेल हला येथून ! त्याला कीर्तन म्हणजें अप्रसंगच वाटेल !

ज्ञानेश्वरमहाराजांचाच दृष्टान्त द्यावयाचा तर ते म्हणतात, " एखाद्या रानांत राहणाऱ्या रानवटाला एकदम जर राजवाड्यांत नेलें, तर त्याला चुकलेंचुकलेंसें होऊन दाही दिशा सुन्या भासूं लागतात व तसें होणें अगदीं स्वाभाविक आहे ( ' रानींचें राऊळा नेलिया । दाही दिशा मानी सुनिया । ' ज्ञा० १८–१६२५ ). अशीच अवस्था खेडेगांवांतील एखाद्या माणसाला जर आपण प्रथमतः मुंबईत नेलें तर त्याची होत असते. चारचार, पांचपांच मजली उंच इमारती ! तो मान वर करून त्यांच्याकडे बघतच उभा राहतो. त्यांच्याकडे नुसतें पाहिले तर चटकन् ओळखतां येतें, कीं हा मुंबईचा मनुष्य नव्हे. हा कुठला तरी घाटावरचा आहे. बोरीबंदरच्या स्टेशनवर त्याला नेलें व दर दोन मिनिटाला आगगाड्या येत आहेत व सुटत आहेत हें त्यानें पाहिलें म्हणजे ही काय भानगड आहे हें त्याला समजतच नाहीं. जितका माणसांचा लोंढा गाडीतून उतरतो तितकाच पुन्हां बसतो. ती गर्दी आणि ती गडबड पाहून हा कावराबावरा होऊन जातो व आपल्या नातेवाईकाला म्हणतो कीं, मला मुंबईला कांहीं करमत नाहीं तर मला माझ्या गांवाला परत पोहोंचतें करा. तसेंच पंढरपूरच्या यात्रेला सर्वच कांहीं वारकरी येत नाहींत. शोकीन लोक यात्रेची

गंमत पाहाण्याकरितां येत असतात. ते वारकरी भजन ऐकण्याकरितां जर बसले, तर त्यांना हे लोक सारखे ' विठ्ठल विठ्ठल ' भजन काय करीत बसले आहेत याचें नवलच वाटतें. त्यांत त्यांना रस वाटत नाहीं. तसेंच धृतराष्ट्राला हा संजय आनंदाच्या आवेशांत वारंवार तोंडानें ' श्रीकृष्ण, श्रीकृष्ण ' असें जें म्हणे व जें कांहीं बोले त्याचें त्याला स्वारस्यच कळेना, ' श्रीकृष्ण, श्रीकृष्ण ' म्हणण्यांत काय आनंद आहे, हें कळविण्याकरितां श्रीरामकृष्णपरमहंस व तुकारामबुवाच लागतात ! हें रहस्य सामान्यांना कळणार नाहीं. वास्तविक संजयाचे शब्द म्हणजे जणूं काय मधाचे थेंबच होते. परंतु धृतराष्ट्राला तो सर्व अप्रसंगच वाटला. शेवटी तो संजयाला म्हणाला, " अरे संजया ! ही तुझी बडबड राहूं दे ! हें जें सांप्रत युद्ध सुरू झालें आहे त्यांत अखेरीस जय कोणाला मिळणार तें सांग ! " ( ' मग म्हणे सांगे प्रस्तुत । उदयलेंसे जें उत्कळित । तें कोणासि बा रे जैत देईल शेखीं ॥ ज्ञा. १८–१६२७ ).

धृतराष्ट्राला जय कोणाला मिळणार हें जाणण्याविषयीं प्रथमपासूनच उत्कंठा लागली होती. ज्याप्रमाणें एखादा रोगी अत्यावस्थ असावा व मग जसें त्याच्या नातेवाईकाला असें वाटतें कीं, वैद्याच्या मुखांतून एकदां ऐकावयास मिळावें कीं, हा रोगांतून बरा होईल; त्याचप्रमाणें धृतराष्ट्राला दुर्योधनाच्या पक्षाला जय हमखास मिळेल असें संजयानें सांगावें असें वाटत होतें. म्हणून त्यानें संजयाला या बाबतींत नुसता प्रश्न न विचारतां त्यांत आपलें स्वतःचें मत व्यक्त करून त्यानें प्रश्न विचारला, तो संजयाला म्हणाला, " संजया ! मागचा पुढचा सर्व विचार केला तर माझा, असा पक्का होरा आहे कीं, ज्या अर्थी प्रतिपक्षाच्या मानानें दुर्योधनाचें सैन्य फार मोठें आहे, त्या अर्थी अखेर जय त्यासच मिळणार; मग तुझें काय ज्योतिष ( भविष्य ) असेल, तें आम्हास कळत नाहीं. पण तें जसें असेल तसेंच सांग. " ( ' आम्हां तंव गमे ऐसें । मा तुझें ज्योतिष कैसें । तें नेणों संजया असे । तैसें सांग पां ॥ ' ज्ञा. १८–१६३० ).

धृतराष्ट्रानें 'या युद्धांत दुर्योधन निखालस यश मिळविणार असें आपलें मत न सांगतां, नुसतेंच या बाबतींत संजयाचें ज्योतिष विचारलें असतें, तर संजयावर एवढा मोठा कठीण प्रसंग नव्हता. परंतु त्यानें आपलें मत सांगून मोठा पेंचप्रसंग निर्माण केला. धृतराष्ट्रानें आपलें स्वतःचें मत सांगून संजयाला खोड्यांत टाकलें. दोघांचें मत एक असतें तर मग संजयाच्या पुढें कोणतीच अडचण नव्हती. परंतु संजयाचें मत पांडवांचा जय होणार असें होतें, तेव्हां मालकाला खरें सांगावें तर तें त्याला बरें वाटणार नाहीं. बरें; खोटें बोलावें, तर स्वतःला बरें वाटणार नाहीं. म्हणून संजयानें खोड्यांतून तिसराच मार्ग काढला, संजय हा मोठा प्रत्युत्पन्नमति होता. तो श्रीमंताच्या घरीं जशी कांहीं 'होयबा' मंडळी असतात, त्यापैकीं नव्हता. संजयानें मर्यादा न सोडतांना पण सत्य सांगितलें. नुसतें सत्य सांगितलें नाहीं तर तें अशा पद्धतीनें सांगितलें कीं, ज्या योगानें मालकाचें मन दुखावलें जाणार नाहीं. नाहींतर कांहीं माणसें सत्य बोलतात परंतु त्यांचें तें बोलणें दुसऱ्याच्या अंतकरणाला बोचतें. उदाहरणार्थ, एक मुलगा होता. त्याच्याजवळ त्याची आई बसली होती, तिऱ्हाईत एक गृहस्थ आले होते. त्यांनीं त्याला बोलतां बोलतां सहज विचारलें कीं, ह्या बाई आपल्या कोण आहेत ? हा थोडासा आचरटच होता. त्या 'आपल्या मातोश्री आहेत' असें सांगण्याच्या ऐवजीं तो म्हणाला, "ही माझ्या बापाची बायको आहे." अशा प्रकारचें उत्तर जरी सत्य असलें, तरीं त्यांत कटुता आहे. महाभारतकारांनीं भाषण कसें करावें याबाबतींत फार गोड मर्यादा घातली आहे. ते म्हणतात, 'मनुष्यानें सत्य बोलावें पण तें गोड बोलावें पण त्याबरोबरच खोटें मात्र बोलूं नये' ('सत्यं ब्रूयात्प्रियं ब्रूयात् न ब्रूयात्सत्यमप्रियम् । प्रियं च नानृतं ब्रूयात् एष धर्मः सनातनः ॥'), ही मर्यादा संभाळून संजयानें प्रस्तुत श्लोकांत धृतराष्ट्राच्या प्रश्नाला उत्तर दिलें आहे. त्यानें आपलें मत मोठ्या शिताफीनें सांगितलें आहे. धृतराष्ट्राचें मन न दुखवितां आपलें सत्य मत काय आहे तें तो सांगतो. अशा प्रसंगी

मोठ्या सावधगिरीनें बोलावें. या बाबतींत मी एक दृष्टान्त देत असतों.

एक राजा होता. त्यानें एक पोपट पाळला होता. त्याच्यावर त्याचें फार प्रेम होतें. राजाला शिकारीचाहि फार शोक होता. तो शिकारी करतां रानांत जावयास निघाला होता व त्याचा तेथें मुक्काम एक आठवडाभर होणार होता. परंतु त्याचप्रसंगीं त्यांचा आवडता राघू बराच आजारी झाला. म्हणून तो आपल्या राजवाड्यांतील नोकरांना म्हणाला कीं, 'माझा मुक्काम आतां रानांत एक आठवडाभर होणार आहे. तरी पोपटाची काळजी घ्या. त्याच्या खुशालीचें वर्तमान रोंज मला कळवीत जा. टपालाबरोबर पोपटाची माहिती रोज कळविली पाहिजे. पण 'पोपट मेला' असें जर कोणी मला कळवील अथवा सांगेल तर त्याला मी तोफेच्या तोंडीं देईन.' याप्रमाणें सांगून राजा शिकारी करतां रांनात निघून गेला.

पुढें दोन तीन दिवसांनीं तो पोपट मेला. मग राजवाड्यांतील नोकरांना असा प्रश्न पडला कीं, ही दुःखद बातमी आतां राजाच्या कानांवर कशी काय घालावी ? कारण तशी बातमी देणें म्हणजे आपल्या हातानें आपल्या अंगावर मरण ओढवून घेण्यासारखें होतें. शेवटीं त्यांच्यापैकीं एक पोक्त नोकर म्हणाला, "मी स्वतः ही बातमी राजास जाऊन सांगण्यास तयार आहें." त्याबरोबर इतरांनीं त्यांची वाहवा केली, ते म्हणाले, "तुम्ही आपण होऊन स्वतः तोफेच्या तोंडी जाण्यास तयार झाल्यानें आम्हां सर्वांवरचें एक मोठें संकटच टळलें आहे. 'जगाच्या कल्याणा संताच्या विभूति' असें जें म्हणतात तें तुमच्यासारखा महात्म्यांच्या बाबतींत अगदीं सत्य आहे!" वास्तविक तो नोकर फार उदार नव्हता पण मोठा हुशार होता. तो राजाला बातमी सांगण्याकरितां रानांत गेला. राजानें त्याला पाहिल्याबरोबर आपला पोपट कसा-काय आहे, म्हणून विचारलें. त्याबरोबर तो म्हणाला, "हुजूर!

आपला पोपट फारच चांगला आहे ! त्याला आता दाणापाण्याचीहि आवश्यकता राहिलेली नाहीं. त्यानें जे एकदा पाय पसरलेले आहेत, ते परत आवरण्याचें त्यास आतां कामच राहिलेलें नाहीं. चोंच जी त्यानें वासलेली आहे, ती पुन्हां तो मिटतच नाहीं. डोळे तर त्यानें कायमचेच मिटून घेतले आहेत." हें ऐकून राजा म्हणाला, "मग पोपट मेला कीं काय?" त्यावर हा वृद्ध म्हणाला, "राजेसाहेब ! तें तुम्ही म्हणा." सांगण्याचा भावार्थ असा कीं, त्या पोक्त नोकरानें जसें 'पोपट मेला' असें साक्षात् न सांगता, तीच गोष्ट पण वेगळ्या भाषेंत सांगितली त्याचप्रमाणें संजय म्हणतो, "राजा ! जय कोणाला मिळेल तें तुझें तूं पहा ! तें मला कळत नाहीं. मला एवढें मात्र कळतें--' यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः। तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥' (गीता १८-७८). ह्याचाच अर्थ जय पांडवांचा होणार.

वास्तविक संजय हा घोडे हांकणारा सूत होता. त्यानें आपलें मत सांगावयाचें कोणाला? काय धृतराष्ट्राला? संजयाची योग्यता ती काय! परंतु संजयानें प्रस्तुत श्लोकांत ज्या स्वरूपाचें उत्तर दिलें आहे, त्याची योग्य संगति लावण्याकरितां ज्ञानेश्वरमहाराजांनीं धृतराष्ट्रानें संजयास प्रश्न केला एवढेंच नव्हे तर, जय कोणाचा होईल या बाबतींत आपलें मतहि सांगितलें, असें आपल्या टीकेंत म्हटलें आहे. असा ह्या प्रस्तुत श्लोकाचा ज्ञानेश्वरमहाराजांनीं फार गोड उपन्यास केला आहे. संजयानें आपलें मत मोठ्या मौजेनें पण छातीठोकपणानें सांगितलें आहे. वास्तविक मालकाच्या विरुद्ध सांगणें म्हणजे नोकरी गमावण्याचा प्रसंग. पण संजय मोठा सत्यवक्ता होता. त्याच्या मतांत निश्चितता आहे. त्यांत मोठा अर्थ भरलेला आहे व म्हणूनच त्याच्या ह्या उत्तराला अथवा सिद्धांताला फार महत्त्व आहे.

संजयानें प्रस्तुत श्लोकांत भगवंताला 'योगेश्वर' हें विशेषण योजलेलें आहे. याचें कारण धृतराष्ट्राच्या मनावर गीताग्रंथाचा

अगदीं प्रारंभीं दुर्योधनानें पांडवांच्या व आपल्या सैन्याच्या बलाबलाचें जें वर्णन केलें होतें, त्या वर्णनाचा परिणाम गीता ऐकूनहि नष्ट झाला नव्हता. दुर्योधन द्रोणाचर्यांच्याजवळ म्हणाला होता कीं, आमचें सैन्य अकरा अक्षौहिणी आहे तर पांडवांचें सैन्य अवघें सात अक्षौहिणीच आहे. आतां नुसती संख्याच जास्त असली पण त्यांत जर पराक्रमी सैनिक व योग्य शस्त्रास्त्रें नसतील, तर त्या जास्त संख्येंचा उपयोग होत नाहीं. उदाहरणार्थ, एक हत्यारबंद बंदुकवाला शंभर विनहत्यारी माणसांना भारी असतो. एवढ्याकरितां दुर्योधनानें आपल्या सैन्याचें वर्णन करतांना असेंहि सांगितलें होतें कीं, आमच्या सैन्यांत नाना प्रकारच्या आयुधांनीं युक्त व युद्धकलेंत अत्यंत प्रवीण असे अनेक योद्धे आहेत. शिवाय भीष्माचार्यांसारखा कुशल सेनापति आहे. याच्या उलट पांडवांच्या सेनेंतील वीर अनुभवी आहेत व त्यांचा सेनानायक भीमासारखा अडदांड म्हणजे कौशल्यहीन असा वीर आहे. सेनापतीच्या ठिकाणीं कौशल्याची फार जरूरी असते. केवळ नुसती शारीरिक ताकद असून काम भागत नाहीं. उदाहरणार्थ, नुसत्या शक्तीच्या जोरावर खेळली जाणारी कुस्ती वेगळी व डावपेचाची कुस्ती वेगळी. ताकद अधिक आहे पण केवळ अडदांडपणानें कुस्ती खेळणाऱ्याचें, ताकद कमी असून पण डावपेंचानें कुस्ती खेळणाऱ्या-पुढें विशेष चालत नाहीं. तात्पर्य, पांडवांचें सैन्य थोडें व सेनापतीहि वेताबाताचा; उलट कौरवांचे सैन्य अधिक व भीष्माचार्यांसारखा अनुभवी, पोक्त व कुशल सेनापति, यामुळें विजयश्री अंतीं आपल्यालाच माळ घालणार असें दुर्योधनानें युद्धाच्या प्रारंभींच सुचविलें होतें ( ' अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् । पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ ' गीता १–१० ). या दुर्योधनाच्या बोलण्यानें कौरवांनाच जय मिळणार हा समज धृतराष्ट्राच्या ठिकाणीं दृढ होऊन बसला होता. म्हणूनच तो संजयाला म्हणतो, “ संजया ! कांहींहि झालें तरी दुर्योधनाचा

प्रताप अधिक ( ' जे दुर्योधनाचे अधिक । प्रताप सदा ॥ ' ज्ञा. १८–१६२९ ). शिवाय त्याचें सैन्यहि फार मोठें, यास्तव त्यालाच विजय मिळणार असें मला वाटतें. मग तुझें ज्योतिष काय आहे तें सांग पाहूं. " परंतु संजयाची समजूत याहुन वेगळी होती. त्याचें ठाम मत होतें कीं, पांडवांचाच जय होणार. याला कारण काय ह्याची कल्पना धृतराष्ट्राला यावी, म्हणून त्यानें या ठिकाणी भगवंताला ' योगेश्वर ' असें महत्वाचें विशेषण दिलें आहे.

तेव्हां ' योगेश्वर ' या शब्दानें संजयाला असें सुचवावयाचे आहे कीं, कर्तुम् अकर्तुम् अन्यथाकर्तुम् ' अशी ज्या भगवंताची अकुंठित सत्ता ( ' गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् । गीता ९–१८ ) व जो जगताचा काळरूपाने ग्रास करीत असतो ( ' कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः । ' गीता ११–३२ ) असा ' योगेश्वर ' भगवान् श्रीकृष्ण साक्षात् पांडवाच्या बाजूला असल्यामुळें त्याच्यापुढें तुझ्या कौरव सैन्याची किंमत, ती काय असणार ? ज्याच्या बळाने हे सैनिक लढणार; तें बळच मुळी पांडवाच्या बाजूला आहे. हे सैनिक म्हणजे जशी भिंतीवर काढलेली सशस्त्र सैनिकांचि चित्रें. चोरांनीं सर्व घर जरी फोडून नेलें तरी हातांत धरलेली जी तलवार आहे. ती कधीं खालीं होणारच नाहीं. दुसरा दृष्टान्त द्यावयाचा तर बुजगावण्याचा. शेताच्या बांधावर एक काठी रोवून त्यावर पालथें मडकें घालतात. दोन बाजूला दोन कलत्या काठ्या जोडतात व त्याच्यावर अंगरखा घालतात. त्यामुळें समोरून दुरून पहाणाऱ्याला जणू काय कोणीतरी माणूसच शेतावर राखण करीत उभा आहे असा भास होतो. पशु, पक्षी इत्यादि प्रांणी य बुजगावण्याला पाहून भितात व पिकापांसून लांब पळून जातात. परंतु चोरांनीं सर्व पीक जरी कापून नेलें तरी हें बुजगावणें कांहींहि हालचाल करीत नाहीं. माणसांचें निवारण करण्याच्या बाबतींत या बुजगावण्याचा कांहींहि उपयोग होत नाहीं. अशा य

बुजगावण्याप्रमाणेंच भगवंताच्या पुढें या कौरव सैन्याचा काय पाड लागणार ? ( ' तरी हे गंधर्वनगरींचे उमाळे । जाण पोकळीचें पेंडवळे । अगा चित्रीव फळें । वीर हे देखें ॥ ज्ञा, ११–४६४ ). मीं या सर्व सैन्याला अगोदरच मारून टाकलेलें आहे. तेव्हां तूं त्यांच्या वधाविषयीं केवळ निमित्ताचा धनी हो म्हणजे झालें, असें भगवंतांनीं गीतेच्या अकराव्या अध्यायांत अर्जुनाला पूर्वीच सांगितलेलें आहे. ( ' मयैवैते निहता पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥ ' गीता ११–३३ )

हें सर्व भगवंताचें म्हणणें ऐकूनहि धृतराष्ट्राच्या अंतःकरणावर मोहाचा पगडा एवढा जबर होता कीं, त्याला दुर्योधनाचेंच म्हणणें अजून खरें वाटून राहिलें होतें. तो कौरवांचाच अंतीं जय होणार असें धरून बसला होता. एका क्षणांत सबंध सृष्टि निर्माण करण्याचें व नाश करण्याचें भगवंताचें सामर्थ्य त्याला ११ अक्षौहिणी सैन्य नाश करण्यास कितीसा वेळ लागणार ! ( ' आंधळ्यापांगळ्यांचा एक विठोबा दाता । प्रसवला विश्व तोचि सर्व होय जाणता । घडी मोडी हेळामात्रें पापपुण्य संचिता । ' तुका ३५२ ). भगवंताच्या केवळ संकल्पमात्रानें सर्व गोष्टी घडत असतात. तेव्हां धृतराष्ट्राच्या समजूतींत बदल पडावा व त्याची भूमिका तयार व्हावी, एवढ्याकरितां संजयानें भगवान् श्रीकृष्णाला येथें ' योगेश्वर ' हें विशेषण लावलेलें आहे.

तसेंच संजयानें अर्जुनाला या ठिकाणीं ' धनुर्धर ' म्हणून विशेषण योजलें आहे. अर्जुन हा नुसता आडनांवाचा ' धनुर्धर नव्हता. तो महान् योद्धा होता. त्यानें एकट्यानें उत्तरगोग्रहणाच्या प्रसंगीं भीष्म, द्रोण, कृपाचार्य, कर्ण, दुर्योधन व इतर सर्व सैनिकांचा पराभव केला होता. खुद्द भगवंतांनींच आपल्या विभूति सांगत असतांना ' अर्जुन ' हा माझी विभूति आहे असें म्हटलें आहे ( ' पांडवांना धनंजयः ॥ ' गीता ११–३७ ). तसेंच अर्जुनाची विख्यात अशीं जीं दहा नांवें आहेत, त्यांत ' विजय ' एक नाव आहे व तें त्याला प्राप्त होण्याचें

कारण संग्रामांत तो युद्धदुर्मंद लोकांवर चालून गेला, तर त्यांना जिंकल्याखेरीज कधींहिं परत फिरत नसे ('अभिप्रयामि संग्रामे यदहं युद्धदुर्मदान् । नाजित्वा विनिवर्तामि ते मां विजयं विदुः ॥' महाभारत, विराटपर्व, अध्याय ४४–१४). शिवाय तो भगवंताचा परम भक्त होता. म्हणूनच संजय म्हणतो कीं 'जेथें योगेश्वर श्रीकृष्ण व जेथें धनुर्धर पार्थ आहे तेथेंच लक्ष्मी, विजय, अभ्युदय व अचल म्ह. अव्यभिचारी नीतिं आहे, असें माझें मत आहे.' याचा आपण आतां थोडक्यांत विचार करूं.

सामान्यतः लोकांची कल्पनां ह्याच्या अगदीं विरुद्ध असते. त्यांच्या मतें जेथें रगड पैसा आहे, सत्ता आहे व युक्ति आहे तेथें यश ठेवलेलें आहे. सामान्य लोकांची तर गोष्ट सोडूनच द्या, परंतु मोठमोठ्यानींहि या श्लोकाचा अर्थ वेगवेगळ्या प्रकारें केला आहे. कांहींनीं या श्लोकाचा अर्थ 'यत्र योगेश्वरः म्ह० जिकडे युक्तिबाज डोकें' व 'यत्र धनुर्धरः म्ह० जिकडे सत्ता अर्थात् मनुष्यबल' (man Power हीं आहेत, तिकडेच संपत्ति, यश, ऐश्वर्य व न्याय हीं नित्य वास करतात', असा केला आहे. ज्ञानेश्वरमहाराजांचा अर्थ याहून अगदीं वेगळा आहे. त्यांच्यामतें 'ज्या ठिकाणीं नरनारायणाची जोडी नांदते, त्याच ठिकाणीं, लक्ष्मी, जय, ऐश्वर्य व शाश्वत नीति राहतात.' ज्ञानेश्वरमहाराज हीच गोष्ट एका ओवींत सांगतात. ते म्हणतात—'जेथ तो श्रीवल्लभु । जेथ भक्तकदंबु । तेथ सुख आणि लाभु । मंगलाचा ॥' (ज्ञा. १८–१६५७) तेव्हां या श्लोकांत संजय एक ठाम सिद्धान्त सांगतो व तो म्हणजे 'जेथें देव आणि भक्त यांचा अधिवास आहे, तेथें शाश्वत सुखाची व कल्याणाची प्राप्ति होते.' हा सिद्धान्त जगतांत आपल्याला जें दिसतें त्याच्या अगदीं विरुद्ध आहे; म्हणून त्याचा खोल विचार करणें अवश्य आहे,

जगतांत आपणांस असें दिसून येतें कीं, 'सत्यमेव जयते' या ऐवजीं 'गुंडः विजयते. सध्यां आपण अशा कालचक्रांतून जात

जात आहोंत कीं, ज्यांत आमच्या उच्च मूल्यांची किंमत उतरत चालली आहे. आमची जी वाङ्मयसंपत्ति आहे व त्यांत जे सिद्धान्त ग्रथित केलेले आहेत, त्याबद्दल लोकांना संशय उत्पन्न होऊं लागले आहेत. आपल्या राष्ट्राची नीति, सद्वृत्ति पालटत चाललेली आहे, ही फार खेदाची गोष्ट आहे. पैसा गेल्यानें एवढें नुकसान होत नाहीं, इतकें नीति बिघडल्यानें होत असतें. परकीयांनीं आजपर्यंत आमच्या देशांत येऊन अनेक वेळां लुटालूट केली; परंतु आमचा देश टिकून राहिला. ह्याला कारण नीति, सद्वृत्ति इत्यादि मूल्यें आम्हीं आजर्यंत जिवापलीकडे जतन करून ठेविलीं. तीं मूल्यें आमच्यातून नाहींशीं' होत आहेत. नीतीनें वागण्यांत मानवाचें कल्याण आहे, हा सिद्धान्त खोटा वाटूं लागला आहे. कारण जे अनीतिमान लोक आहेत, ते समाजांत सभ्य गृहस्थ म्हणून वावरूं लागले आहेत. ज्यांनीं काळा बाजार केला, अक्षरशः लोकांचीं घरें लुटलीं, ते श्रीमंत झालेले आपणांस दिसून येतात. तेव्हां नीतीनें व सत्यानें वागण्यांत कांहीं फायदा नाहीं, असें लोकांना वाटूं लागलें आहे.

वस्तुतः पैसा व लोकमत यांवर नीति अवलंबून नाहीं. नीतीचा पाया बहुमत नव्हे. मत देणारे कोण लोक आहेत, त्यांची योग्यता काय आहे, ह्याचा विचार करणें अवश्य आहे. मी नेहमीं सांगत असतों कीं, किती मूर्ख जमले म्हणजे एक शहाणा होतो? वास्तविक हें त्रैराशिकच चूक आहे. दोघांची जातच वेगळी आहे. एक गृहस्थ माझ्याकडे आले व मला म्हणाले कीं, 'तुमच्या कॉलेजमध्यें मला व्याख्यान द्यावयाचें आहे, कीं, पृथ्वीभोंवतीं सूर्य फिरतो, पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरत नाहीं.' मी त्यांना म्हटलें कीं, 'प्रथमतः तुम्ही खगोलविद्येंत जे पारंगत आहेत, त्यांच्यापुढें व्याख्यान द्या व त्यांना जर आपलें मत पटलें तरच मग आपलें व्याख्यान कॉलेजमध्यें करूं.' सांगण्याचा आशय असा कीं, वाटेल त्याच्या मताला किंमत नाहीं. न्यूटन, भास्कराचार्य यांसारखे

पंडित काय म्हणतात याला किंमत आहे. भगवंताचे जे अनुग्रहित आहेत, त्यांचें जें मत ती नीति होय. चार लोक जे ठरवतील ती नीति, हें होऊंच शकत नाहीं. भगवंताला ज्याला साक्षात्कार झालेला आहे, तो सांगेल तेंच शास्त्र होऊं शकतें. या दृष्टीनें संजयानें प्रस्तुत श्लोकामध्यें जो सिद्धान्त सांगितला आहे कीं, 'जेथें भगवंत व भक्त यांचें वास्तव्य आहे तेथेंच यश आहे' व त्यालाच महत्त्व आहे.

परंतु जगतांत कांहीं प्रसंगीं गुन्हेगार लोकहि चांगला वकील देऊन निर्दोषी म्हणून सुटलेले दिसतात. मी तुरुंगांत धार्मिक शिक्षण देण्याकरितां म्हणून जात असें. एकदां तेथील एका तुरुंगाधिकाऱ्यानें मला विचारलें, "दांडेकर, तुम्ही या कैद्यांना काय सांगणार?" मी त्यांना म्हटलें कीं, "मी दोन गोष्टी सांगणार. एक, तुम्ही जरी आज गुन्हेगार असलां तरी कायमचे गुन्हेगार राहूं शकणार नाहीं. तुम्हांला जर खरोखरीचा अनुताप प्राप्त होईल व तुरुंगांतून सुटल्यानंतर दुराचरणाचा त्याग करून तुम्ही जर भगवंताची अनन्यवृत्तीनें उपासना करीत राहाल तर अंतीं तुमचा उद्धार निश्चित होईल. [' अपि चैत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् । साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥' गीता ९-३० ]. आणि दुसरी गोष्ट म्हणजे जगतांत तुम्हीच तेवढे गुन्हेगार आहांत असें नाहीं. बाहेरहि अशी कृत्यें करणारे लोक आहेत कीं, ज्याबद्दल त्यांना दोनदा फांशी द्यावें! परंतु केवळ पैशाच्या व सत्तेच्या जोरावर ते सभ्य म्हणून वावरत आहेत." व्यापारांतहि अवास्तव नफा घेऊन किंवा लाचलुचपतीचा व्यवहार करून श्रीमंत झालेले लोक आपणांस दिसून येतात. या बाबतींत मुंबईत घडलेली एक गोष्ट मी आपणांस सांगतों.

' मी व माझ्याबरोबरची कांही मंडळी अशी मुंबईत रस्त्याच्या कडेनें चाललों होतों. माझ्यामागून माझाच एक विद्यार्थी, पूर्वी शिक्षकाचे काम करणारा पण तें सोडून नंतर मोठा व्यापारी

बनलेला, असा मोटारींतून त्यांच रस्त्यानें येत होता. मला पाहून त्यानें मोटारीचा हॉर्न वाजविण्यास सुरुवात केली; माझें लक्ष त्याच्याकडे गेल्यावर त्यानें तेथेंच मोटार थांबविली. मोटारींतून उतरून तो मज-जवळ आला व म्हणाला, " दांडेकर ! तुम्हीं ओळखलेंत कां मला ? मी पूर्वी तुमचा विद्यार्थी होतों. परंतु नुसता ' शा–मा व पो–मा '-करीत राहिलों नाहीं. मी व्यापारांत शिरलों व लाखों रुपये मिळविले. आज मुंबईत माझ्या मालकीच्या अशा चार मजली चाळी आहेत. " ' शा–मा व पो–मा ' म्हणण्यांत त्याला असें सांगावयाचें होतें कीं, मी शाळामास्तरची व पोस्टमास्तरची नोकरी करीत राहिलों नाहीं. कारण त्यांत काय पैसा मिळणार ? सांगण्यांचा आशय असा कीं, अप्रामाणिकपणें व्यापार करून जरी मनुष्य श्रीमंत झाला तरी लोक त्याला मान देतात व त्याच्याच बाजूला यश दिसतें. ह्याच्या उलट, प्रामाणिक माणसांचे हाल झालेलेहि आपण जगतांत पाहतों. जे खरे भक्त आहेत त्यांच्या वांट्याला अपयश आलेलें दिसतें. यामुळें जे विचार करणारे लोक आहेत, त्यांनाहि कित्येक वेळां अशी शंका उत्पन्न होते कीं, आपण धर्मप्रमाणें वागावें कां न वागावें ? हें जरी सर्व खरें असलें तरी जो ' मागचा व पुढचा ' म्हणजे ' पूर्वजन्म व उत्तरजन्म ' यांस अनुलक्षून या नीतिविषयक शाश्वत मूल्यांचा विचार करील त्याला संजय जें म्हणतो कीं, ' जेथें भगवंत व भक्त आहेत तेथेंच यशादि सर्व अभ्युदय आहे ' तें सत्य आहे असें प्रत्ययास आल्याखेरीज राहाणार नाहीं.

कांहीं काळपर्यंत नीतीनें व धर्मानें वागणाऱ्या लोकांता अपयश आलेलें जरी दिसलें, तरी अंतीं त्यांना यश हें लाभतेंच. आपण कधीं कधीं सूर्याला ग्रहण लागलेलें पाहतों पण त्यामुळें सूर्य नाहींसा होत नाहीं. तेवढा काळ गेल्यानंतर पुन्हां आपल्या प्रकाशानें तो आकाशांत तळपतच असतो. त्याचप्रमाणें नीतिमान् लोकांचा कांहीं काळ जरी संकटात गेला, तरी अंती ते आपल्या कीर्तिनें तळपतच राहतात. उदाहरणार्थ, तुकारामबुवांच्या घरीं

अठरा विश्वें दारिद्र्य होतें. ते स्वतः आपल्या घरची परिस्थिति एका अभंगांत सांगतात. ते म्हणतात, ' आम्ही सदैव सुडके । जवळी येतां चोर धाके । जाऊं पुढें भिके । कुतरी घर राखती ।। ' ( तुका० १९७९ ). परंतु त्यांनीं जरी जन्मभर हाल भोगले तरी त्यांनीं एवढी दिगंत कीर्ति मिळविली कीं, आज जरी त्याना वैकुंठवासी होऊन सुमारें साडेतीनशें वर्षें झाली आहेत, तरी हजारों लोक स्वतःचे पैसे खर्च करून व कष्ट सोसून प्रतिवर्षी त्यांचें दर्शन घेण्याकरितां देहूच्या यात्रेस जमत असतात. अशी कीर्ति पृथ्वीच्या पाठीवरील एकाहि राजाला प्राप्त झालेली दाखवून देणें कठिण आहे. आपण ज्ञानेश्वरमहाराज, तुकारामबुवा वगैरे साधुसंतांची चरित्रें जर अवलोकन केलीत तर त्यांनीं आपल्या जीवनांत अत्यंत कष्ट व दैन्य सोसलें आहे असें आपणांस आढळून येईल. परंतु असेना कां दारिद्र्य ! साक्षात् लक्ष्मीपति भगवान् त्यांचे अंकित असत ( ' देव इच्छी रज चरणींची माती । धांवत चालती मागें मागें ।। ' तुका. २२–३६ ) एखादा लुंगासुंगा बुवा आजहि त्यांच्या नुसत्या नांवावर लाखो रुपये मिळवूं शकतो मग या संतांनीं जर मनांत आणलें असतें तर ते सहज श्रीमंत होऊं शकले असते. परंतु त्यांनीं धर्मरक्षणार्थ जाणूनबुजून दारिद्र्य पत्करलें. तेव्हां संजय जें सांगतो कीं, ' यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः । तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नितिर्मतिर्मम ।। ' ( गीता १८–७८ ), हें अगदी सत्य आहे.

या जगताच्या बुडाशीं चिद् अशी एक जाणती सत्ता आहे व त्याबरोबरच निश्चित योजनाहि आहे ( ' ऋतं च सत्य चाभीद्धात्तपसोऽध्यजयात ।–संध्या ). ' ऋत ' म्ह० सृष्टिनियम अथवा कर्मांचा कायदा. हा कर्मांचा असा आहे कीं, कोणतेंहि कर्म केलें की त्या कर्मानुरूप त्या कर्मांचें बरें-वाईट फल प्राप्त झाल्यावाचून राहात नाहीं. तेव्हां अनीतिमान अथवा लबाड माणसांची चलती या जगतांत कांहीं काळपर्यंत दिसते; ह्याला कारण त्यांचें पूर्व संचित होय. ह्याचा अर्थ पाप चांगलें असें नव्हे. अंती ते रसातळालाच जातात. जो

सद्‌गुणी आहे, तो सुखी असावा असें वाटणें अगदीं स्वभाविक आहे. परंतु त्यांतील कांहीं लोक दुःख भोगतांना दिसतात, ह्याचें कारणहि त्यांचें पूर्व संचितच होय. मनुष्य जें कर्म करतो त्याचें फल त्याला तावडतोब मिळतें, असें मुळीच नाहीं. झाडें लावलीं तर त्या सर्वांना एकदमच फळें येत नाहींत. त्याप्रमाणें कांहीं कर्माचीं फलें एकदम मिळतात. पण कांहींचीं फलें मिळावयास वेळ लागतो.

या जगतामध्यें आपणांस श्रीमंत–गरीब वगैरे जी विषमता दिसून येते, त्याचा उलगडा होण्याकरितां पूर्वजन्म व उत्तरजन्म मानावेच लागतात. उदाहरणार्थ, एखादा मुलगा जन्मतःच आंधळा जन्मास येतो. हें त्याच्या पूर्व जन्मांतील पापकर्माचेंच फळ होय, असें मानणें भाग पडतें. तसें न मानल्यास अकृताभ्यागम ( म्ह० जें केलें नाहीं त्याचें फल भोगावें लागणें ) हा दोष येतो. म्हणून पूर्वजन्म मानावा लागतो. तसेंच कित्येक वेळां दुष्कृत्य करणाऱ्या मनुष्याला कांहीहि शिक्षा होत नाहीं, अथवा सत्कृत्य करणाऱ्याला परितोषिक मिळत नाहीं; अशी उदाहरणें पाहिली म्हणजे कृत प्रणाश ( म्ह० केलेलें कर्म फुकट जाणें ) हा दोष येतो. म्हणून उत्तरन्म मानावा लागतो. तेव्हां प्रस्तुत जन्मांत केलेल्या पापाचें-अथवा पुण्याचें फल त्याला या अथवा अन्य जन्मीं भोगावेंच लागतें, असें आमचें शास्त्र सांगतें. कांही कर्माचीं फलें या हाताची त्या हातावर याप्रमाणें प्राप्त होतात. कांहींना वेळ लागतो. पण कर्मफलें भोगावींच लागतात. म्हणून चोरी केली व ती जरी पचली गेली किंवा आपल्याला लक्ष्मी व वैभव हीं जरी अप्रमाणिक माणसांच्या द्वारांत दिसलीं, तरी दुष्कृत्याचें फल त्यांना केव्हां ना केव्हां तरी भोगावेंच लागतें. अनीतिमान पुरुषाला त्याच्या पूर्व प्रारब्धाची जोंपर्यंय सद्दी असते तोंपर्यंत कांहींहि जरी केलं तरी त्याच्या जीवनांत त्याला सारखें यशच मिळत असतें. परंतु कर्माचा फायदा असा बलवत्तर आहे कीं, बऱ्या वाईट केलेल्या कर्माचें फल त्याला पुढें भोगावेंच लागतें. पुढें म्हणजे पुढल्या वर्षी असा त्याचा अर्थ

नाही. यंदाच्या निवडणूकींत एखादा मनुष्य पडला तर पुढील निवडणुकीमध्यें पुन्हां निवडून येण्याची आशा असते. परंतु केलेल्या चांगल्या अथवा वाईट कर्मांचें फल हें बहुधा पुढच्या जन्मीच मिळण्याचा अधिक संभव असतो. एवढ्याकरितां सत्कर्म करणाऱ्यां माणसानें सत्कर्म करीत असतांना जरी त्याला संकटें प्राप्त झाली, तरी त्यानें आपलें धैर्य खचूं देऊं नये. धर्माप्रमाणें वागणें हें सतीचें वाण आहे. धर्माचरण करणाऱ्या माणसाची प्रसंगविशेषी लोक निंदा करतात. परंतु मनुष्यानें निराश न होता आपलें सत्कर्म करीत राहावें; मग त्याचें फल जें यश व सुख तें अंती त्याला प्राप्त होतेंच.

तात्पर्य, या जगताच्या बुडाशीं जाणती व न्यायी अशी ईश्वराची सत्ता आहे व त्या सत्तेनेंच प्रत्येकाला आपापल्या कर्मांप्रमाणें शुभाशुभ फलें मिळत असतात. ईश्वर आपणाहून कोणालाहि पाप किंवा पुण्य देत नाहीं व बळेंच सुखदुःखादि भोगहि भोगावयास लावत नाहीं ( ' नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः ॥ ' गीता ५–१५ ).

श्रीमच्छंकराचार्यांनीं ईश्वर हा पर्जन्याप्रमाणें आहे असें म्हटलें आहे. पर्जन्य जरी सर्व ठिकाणीं सारखा पडला असें गृहीत धरलें तरी जसें बीज तसेंच धान्य येतें; यांत पर्जन्य हें साधारण कारण असून बीज हें असाधारण कारण आहे. तद्वतच सत्ता, स्फूर्ति आणि प्रकाश यांच्या द्वारां ईश्वर सर्व कार्यांना साधारण कारण आहे; परंतु मनुष्याला जी उच्च व नीच स्थिति प्राप्त होते, त्याचें असाधारण कारण प्रत्येकाचें कर्मच आहे. दुःख हें जसें आपल्याच दुष्कर्मांचें फल आहे, तसें सुख हेंहि आपल्या सत्कर्मांचेंच फल होय ( ' सुखस्य दुःखस्य न कोऽपि दाता । परो ददातीति कुबुद्धिरेषा ॥ ' ).

मनुष्याला यश आलें म्हणजे वाटतें कीं, माझ्या प्रयत्नामुळें आलें. खरें असें असतें कीं, देवाला त्याला चालवून घ्यावयाचें

असतें. देवाची इच्छा असतें तोंपर्यंत त्या सर्व गोष्टी अनुकूल घडत असतात. हें पटवून देण्याकरितां एक व्यावहारांतील सामान्य दृष्टान्त देण्यासारखा आहे. एक रावसाहेब होते. सुटीचा दिवस असल्यामुळें कचेरींत कामाला न जातांना ते त्या दिवशीं घरींच राहिले होते. ही संधि पाहून बाकीच्या घरांतील सर्व मंडळींनीं त्या दिवशी दुपारी सिनेमा पाहावयास जाण्याचें ठरविलें व घर संभाळण्याकरितां रावसाहेबांनीच घरी राहावें असें ठरलें. रावसाहेबांचा एक चार वर्षांचा खोडकर मुलगा होता. ही सर्व मंडळी जेव्हां सिनेमाला जावयास निघाली तेव्हां तो मुलगा झोपी गेला असल्यामुळें त्यालाहि त्यांनीं घरीं ठेवलें व ही सर्व मंडळी सिनेमा पहावयास गेली. घरी फक्त रावसाहेब व त्यांचा झोपी गेलेला धाकटा मुलगा बाळ्या एवढेच राहिले. रावसाहेब आपल्या खोलीत तक्क्याला टेकून समोर मेज घेऊन कांहीं लिखाण करीत बसले होते. कांहीं काळानंतर त्यांचा बाळ्या झोपेंतून उठला व त्याच खोलींत खेळत राहिला. पुढें त्या बाळ्याला अशी लहर आली कीं, रावसाहेबानांच आपण घोडें करावें व त्यांच्या पाठीवर बसून त्यांना ' घोडें घोडें ' म्हणून रावावें. म्हणून तो एकदम त्यांच्या मानेवर जाऊन बसला व त्यांना म्हणाला कीं, आपण आता घोड्या घोड्याचा खेळ खेळूं. रावसाहेबांनीं पाहिलें की, घरांत कोणीहि माणसें नाहींत व फोटो घेण्यासहि कोणी आसपास नाहीं, तेव्हा बाळ्याची क्षणभर करमणूक करावयास हरकत नाहीं. असा विचार करून रावसाहेब ओणवें होऊन रांगू लागले. बाळ्या त्यांच्या पाठीवर बसला व बाळ्यानें जवळच पडलेली लेखणी हातांत घेतली व रावसाहेबांना घोडें करून ' ड्याड्या ' म्हणून त्यांना हाकूं लागला. सांगण्याचा भावार्थ असा कीं, बाळ्याची इच्छा व मुख्यतः रावसाहेबांची स्वतः घोडें होण्यास संमति, ह्यांचें जेव्हां एकीकरण झालें, तेव्हाच बाळ्याचा खेळ सिद्धिस गेला. रावसाहेबांनीं मनांत आणलें असतें तर त्यांनीं बाळ्याला केव्हांच नामोहरम केलें असतें.

इद्वतच मनुष्याचें प्रारब्ध म्हणजे त्याच्या दैवाची सद्दी व ईश्वराची सत्ता याचें एकीकरण झालें तर मनुष्याच्या कार्यांत यश येत असतें. मनुष्य मात्र उगीच मी अमुक केलें व मी तमुक केलें अशी घमेंड मारीत बसतो. ' माणसाची देव चालवी अहंता। मीच एक कर्ता म्हणों नये ॥ ' तुका. ३३३७ ईश्वराला जेव्हा विशिष्ट व्यक्तीला साधनीभूत करून एखादें कार्य घडवून आणावयाचें असतें त्यावेळीं ती व्यक्ति जें करील त्यांत यश येत असतें. उदाहरणार्थ, गेल्या महायुद्धांत प्रारंभीं प्रारंभी हिटलर जसें ठरवी म्हणजे अमक्या तारखेला अमुक शहर हस्तगत करणार, त्याप्रमाणें सर्व होत गेलें. पुढें त्याची सद्दी संपली. देवाची जी योजना होती त्यांतील त्याचा उपयोग संपला, तेव्हा त्याला अपयश येऊं लागलें व शेवटीं त्याला आत्महत्त्या करून मरावें लागलें ! वास्तविक मनुष्याची कृति थोडी, त्यांत ईश्वराचेंच सहाय्य अधिक असतें उदाहरणार्थ, शेतकरी धान्याचें बीं पोत्यांत घालून तें पाठीवर शेतात पेरण्याकरितां नेतो व तें पेरतो. परंतु उगवल्यानंतर त्याचें एवढें धान्य होतें. की, तें त्याला पुष्कळ पोत्यांत घालून बैलगाडींतून वाहून घरीं आणावें लागतें. हें केवळ ईश्वराच्या सत्तेचें फल आहे. तेंच जर गारांचा पाऊस पडता तर आलेलें पीक नष्ट होतें. ईश्वर हा सत्ता स्फुर्ति व प्रकाशरुप आहे. लोक म्हणतात की आम्हांला ईश्वर दाखवा ! परंतु तो कांहीं बाजारांत ज्याप्रमाणें बाहुल्या मिळतात त्याप्रमाणें मिळणारी चीज नाहीं. तो इंद्रियांना व प्रमाणांना गोचर होणारा नाहीं (' यच्चक्षुषा न पश्यति येन चक्षूंषि पश्यति । ' केनोपनिषत् १–६ ). सत्ता ही दाखवितां येत नाहीं, ती कार्यानुमेय असते. उदाहरणार्थ, इंग्रजांची सत्ता गेली व त्या ऐवजी आपली सत्ता आली. पण जेव्हा इंग्रज अधिकारी बोटींत बसून विलायतेला परत गेले, त्यावेळीं मुंबई बंदरावर या सत्तेचे फोटो कोणी काढूं शकले नाहींत; कारण सत्ता ही दृश्य नाहीं. आतां आपण मोठमोठालीं धरणें बाधूं शकतों व पंचवार्षिक योजना पार पाडूं शकतों. इत्यादि कार्यांवरून सध्या हिंदुस्थानांत

आपली सत्ता आहे ह्याचें ज्ञान आपणांस होतें. तेव्हां या जगताच्या बुडाशीं चिच्छक्ति आहे व त्या ईश्वराच्या सत्तेनेंच हें सर्व सृष्टिचक्र सुरळित चाललेलें आहे ( ' तमेव भान्तमनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति । ' मुण्डक. उप. २-२-१० ) त्या ईश्वरी सूत्रांत आपलें कार्य बसलें म्हणजे त्याला यश येत असतें.

लोकांना जेथें पैसा व सत्ता आहे ( ' यस्यस्ति वित्तं स नरः कुलीनः । ) तेथें यश आहे असें वाटतें. परंतु हें यश शाश्वत नाहीं. धर्मावर उभारलेली नीति व मानसशास्त्रावर उभारलेली नीति यांत महदंतर आहे. जेथें भगवंताचें व भक्ताचें अधिष्ठान आहे, तेथेंच शाश्वत स्वरूपाची नीति व वैभव आहे; हें जें संजय सांगतो तें त्रिवार सत्य आहे. कांहीं गोष्टी मनुष्याच्या हातांत आहेत व कांहीं नाहींत. एक जुन्या काळचे श्रीमंत गृहस्थ होते. त्यांना आपल्या मुलानें शिकावें असें वाटत होतें. म्हणून त्यांनीं त्याला शिकविण्याकरितां दरमहा चाळीस रुपये देऊन एक शिक्षक ठेवला. मुलानें सांगितलें, " बाबा ! मला शिकावयाचें नाहीं. शिक्षकाला उगीच पैसे देऊन व्यर्थ कां घालविता ? त्या ऐवजी मला दरमहा दीड तोळा सोनें देत जा. " अर्थात् त्या काळीं सोनें स्वस्त म्हणजे अवघें पंचवीस रुपये तोळा होतें. सांगण्याचा आशय असा कीं, नुसतें वडिलांना वाटून काय उपयोग ? आपला मुलगा विद्वान् निपजेल, आपणास दुःख, दारिद्र्य येणार नाहीं वगैरे गोष्टी आपल्या हातांतील नाहींत. ( ' हा गा रोगु कायी रोगिया । आवडे दरिद्र दरिद्रिया । परी भोगविजे बळिया । अदृष्टें जेणें ।। ' ज्ञा. १८—१२९७ ). परंतु सदाचारानें वागणें, पाप न करणें, खरें बोलणें, धर्माप्रमाणें वागणें, कुलपरंपरागत विद्येचा अभ्यास करणें, आई-बाप व गुरु यांची सेवा करणें, अतिथीचा सत्कार करणें, गरीबांचा परामर्ष घेणें, सत्पात्रीं दान करणें, आपल्या ज्ञातीच्या व राष्ट्राच्या अभ्युदयाकरितां झटणें इत्यादि गोष्टी मनुष्याच्या हातांतील आहेत. ( ' सत्यं वद । धर्मं चर । स्वाध्यायान्मा प्रमदः । मातृदेवो भव पितृदेवो भव । आचार्यदेवो भव । अतिथिदेवो भव । श्रद्धया

देयं ॥ तैत्तिरीयोपनिषत् । ). यालाच आत्मस्वातंत्र्य म्हणतात. प्रत्येकाला आपल्याला चांगली स्थिति, सुख, शांति, समाधान, व अमरत्व प्राप्त व्हावें असें वाटत असतें. ( ' असतो मा सद्गमय । तमसो मा ज्योतिर्गमय । मृत्योर्मा अमृतं गमय ॥ ' बृह. उप. १-३-२८ ). कर्मा कायदा असा आहे कीं, जसें करावें तसें भरावें किंवा जसें पेरावें तसें उगवतें. या न्यायानें सत्कर्माचें शुभ फल व असत्कर्माचें अशुभ फल, या किंवा अन्य जन्मीं निश्चित मिळतेंच. तेव्हां प्रस्तुत श्लोकांत जो अढळ सिद्धान्त सांगितला आहे त्याच्यावर निष्ठा ठेवून प्रत्येकानें शुद्ध आचरण ठेवून आपापल्या वाट्याला आलेलें कर्म ईश्वरार्पण बुद्धीनें करीत राहिल्यास त्याला कालान्तरानें कां होईना पण आत्मप्राप्ति व तद्द्वारां जन्माभावरूपी मोक्षप्राप्ति झाल्याखेरीज राहणार नाहीं ( ' नहि कल्याणकृत् कश्चित् दुर्गतिं तात गच्छति ॥ गीता ६-४० ). तात्पर्य, जीवाचें ऐहिक व पारलौकिक कल्याण कशांत आहे, तें सांगणारा हा श्लोक असल्यामुळें याचें महत्त्व असामान्य आहे.

प्रस्तुत श्लोकांत जो सिद्धान्त ग्रथित केलेला आहे, त्यावर ज्ञानेश्वरमहाराजांची किती निःसीम श्रद्धा आहे ही गोष्ट त्यांनीं या श्लोकावर ज्या ओव्या लिहिलेल्या आहेत व त्यांतून जें विस्तृत व्याख्यान केलें आहे त्यावरून कळून येईल. टीकाकाराच्या मनांत विशिष्ट सिद्धान्ताबद्दल जी निष्ठा असते, निश्चितता असते, ती लोकांना पटावी असें जेव्हां त्याला वाटतें, तेव्हांच तो विस्तृत व्याख्यान करीत असतो. उदाहरणार्थ, पत्रामध्यें एखादे वेळीं ' जरूर, जरूर, जरूर ' येणे असें लिहिलेलें असतें. तीनदां जरी एकच शब्द लिहिला तरी त्याचा अर्थ एकच असतो. परंतु त्रिवार लिहिण्यांत लिहिणाऱ्याची कळकळ व आगत्य ही त्यांतून व्यक्त होत असतात. तद्वतच सामान्य लोकांच्या बुद्धीच्या कक्षेच्या पलीकडचा, अर्थात् त्यांना पटावयास कठिण, असा एखादा सिद्धान्त असला व त्यावर लेखकाचा ठाम विश्वास असला म्हणजे तो सिद्धान्त पटवून देण्याकरितां तो अनेक दृष्टान्त देत असतो.

ज्ञानेश्वरमहाराजांनीं या श्लोकावर व्याख्यान करतांना भिन्न भिन्न असे अनेक दृष्टान्त दिले आहेत. या सर्व दृष्टान्तांनीं ज्ञानेश्वरमहाराजांनीं प्रस्तुत श्लोकांत जें अंतिम सत्य सांगितलें आहे, तें अगदीं यथार्थ आहे असें पटवून दिलें आहे. उत्कृष्ट काव्य म्हणूनहि या सर्व ओव्या अत्यन्त सुंदर अशाच आहेत.

या श्लोकावर लिहितांना ज्ञानेश्वरमहाराज पहिल्याच ओवींत सांगतात कीं, संजय धृतराष्ट्राला म्हणाला, " राजा ! या दोन पक्षांत एकमेकांचें काय होईल, म्हणजे कोण विजयी होईल, हें कांहीं मला कळत नाहीं ( ' जी येरयेरांचें मी नेणें । ' ज्ञा. १८–१६३१ ). पण मी एक सिद्धान्त जाणतों, तो असा— आयुष्य असलें म्हणजे जगणें खास आहेच आहे ! ( ' परी आयुष्य तेथें जिणें । हें फुडें कीं गा ॥ ' ज्ञा. १८–१६३१ ). हा निश्चित असा सिद्धान्त आहे. यांत कधींहि बदल होणार नाहीं. आयुष्य आहे ना ! मग तो जगणारच. आयुष्य संपलें कीं, मग कांहीं केलें तरी मनुष्य जगूं शकत नाहीं. मनुष्याचें शरीर हें इतकें विलक्षण आहे कीं, त्यांत बिघाड केव्हां होईल व कोणत्या कारणानें होईल हें सांगतां येत नाहीं. शरीरांतील विशिष्ट दोष घालविण्याकरितां विशिष्ट इन्जेक्शन् दिलें जातें, परंतु एखादे वेळीं शरीरावर त्याची अगदीं विरुद्धच प्रतिक्रिया होते. त्याला बिचारा डॉक्टर काय करणार ? श्रीमंत मनुष्य आसन्नमरण असला म्हणजे त्याचे नातेवाईक डॉक्टरला त्याच्याजवळ सारखे बसवून ठेवतात. तोहि वारंवार नाडी पहात असतो. परंतु शेवटीं नाडी सुटते, याला काय करतां ? एकाला तीन महिने रोज बारीक ताप येत असे. परंतु शेवटपर्यंत त्याचें निदान झालें नाहीं व शेवटीं त्यांतच त्याचा अंत झाला. कारण शरीर हें असें एक यंत्र आहे, कीं एखादें वेळीं त्यांत काय बिघाड झाला आहे, हें कळूनच येत नाहीं. म्हणून आपणांस प्रसंगविशेषीं असेंहि आढळून येतें कीं, डॉक्टर सांगतो हा रोगी निदान आणखी सांत दिवस तरी मरणार नाहीं; परंतु तो दुसऱ्या दिवशींच मरतो. परंतु संजय जो सिद्धान्त

सांगत आहे, ' जेथें आयुष्य आहे तेथें जगणें आहेच ' तो मात्र निसर्गाचा कितीहि कोप झाला तरी सत्यच ठरतो. मागें बडोद्याला खूप पाऊस पडला व त्यामुळें तेथील नदीला महापूर आला. त्यांत कित्येक माणसें, गुरेंढोरें वाहून गेलीं व मरण पावली. त्या महापुरांत एका पाळण्यांत तीन महिन्यांचें मूल वाहत आलें व तें मात्र जगलें. तात्पर्य, आयुष्य असलें म्हणजे मारणाराच तारक होत असतो; पण तें का संपलें म्हणजे मरावेंच लागतें. तात्पर्य, ' आयुष्य तेथ जिणें ' हा सिद्धान्त जसा खरा आहे त्याचप्रमाणें जेथें भक्तासहित भगवंताचा वास आहे, तेथें यश व कल्याण हीं निश्चित आहेत, असें समजावें.

ज्ञानेश्वरमहाराज दोन वस्तूंचें नियमानें एकत्र साहचर्य दाखविणारे असे आणखी दृष्टान्त देतात. उदाहरणार्थ—' चंद्र तेथें चंद्रिका । शंभु तेथें अंबिका । संत तेथें विवेका । असणें कीं जी ॥ ' ( ज्ञा. १८–१६३२ ), चंद्र आहे तेथें चांदणें हें असणारच. चांदणें म्हणजे चंद्राचें अंगच होय असें म्हणावयास हरकत नाहीं. कारण एक दुसऱ्यावांचून राहूंच शकत नाहीं. तसेंच जेथें शिव आहे तेथें शक्ति ही असायचीच कारण शक्ति ही शंकरांची अर्धांगी आहे. किंवा जेथें संत आहेत तेथें विवेक हा असलाच पाहिजे. त्याचप्रमाणें जेथें भगवंताचें अधिष्ठान आहे, त्या ठिकाणीं यश हें ठेवलेंच आहे.

सामान्यतः लोक विवेक आणि विचार या दोहोंचा अर्थ एकच समजतात. परंतु संतांचें ठिकाणीं असणारा विवेक व प्रापंचिक लोकांच्या ठिकाणी असणारा विचार यांत फरक आहे. लोक वधु किंवा वर पाहतांना विचार करतात, किंवा पैसे मिळवितांना अथवा धंदा करतांनाहि विचार करतात. परंतु व्यवहारांत आपण ज्याला विचारी अथवा विवेकी म्हणून म्हणतों त्याहून परमार्थातील विवेक निराळा आहे. नित्य–अनित्य, सत्य—असत्य, शाश्वत–अशाश्वत, सार–असार, आत्मा–अनात्मा, यांची जी निवड तिला ' विवेक '

म्हणतात. थोडक्यांत सांगावयाचें तर जगत्, जीव व परमात्मा या तिघांच्या स्वरुपाचें जें यथार्थ ज्ञान त्याला ' विवेक ' म्हणावें. सामान्यतः लोकांच्या ठिकाणीं हा विवेक नसतो. ही गोष्ट त्यांच्या वागणुकीवरून कळून येते. कारण विवेक अथवा विचार ह्या डोळ्यांनीं दिसणाऱ्या वस्तु नाहींत. ज्याप्रमाणें जमिनीचा मृदुपणा, हा कोंभांच्या लुसलुशितपणावरून कळून येतो, किंवा मनुष्य कुलीन आहे हें त्याच्या आचारावरून जसें प्रत्ययास येतें ( ' कां भू-मीचें मार्दव । सांगे कोंभाची लवलव । नाना आचार गौरव । सुकुलीनाचे ॥ ज्ञा. १३–१८० ) ; त्याप्रमाणें हा मनुष्य विवेकी आहे कां अविवेकी आहे, हें त्याच्या बाह्य क्रियेवरून म्हणजे आचरणावरून कळून येतें. जर लोकांच्या ठिकाणीं हा विवेक असता तर असार अथवा मिथ्या जे विषय, त्यांच्या मागें लोक धांवले नसते. ( ' विषयओढी भुलले जीव । ' तुका. ७०१ ). तेव्हां लोकांच्या ठिकाणीं विचार आहे पण विवेक नाहीं. संतांच्या ठिकाणीं मात्र हा आत्मानात्मविवेक असतो. हें सर्व जगत् म्हणजेच सारासारचें मिश्रण होय. यांत अधिष्ठानरूप जें ब्रह्म तें सत्य ( म्ह० अविनाशी ) आहे व हें सर्व प्रतीत होणारें जगत् व जगदंतःपाती सर्व पदार्थ मिथ्या ( म्ह० नाशिवंत ) आहेत, असा जो निश्चय त्यालाच आत्मनात्मविवेक म्हणतात. ( ' तैसें विचारितां निरसलें । ते प्रपंचु सहजें सांडवलें । मग तत्त्वता तत्त्व उरलें । ज्ञानियांसी ॥ ' ज्ञा. २–१३१ ). म्हणून संत असार जे विषय त्यांचा त्याग करून सारभूत जो परमात्मा त्याचेंच ग्रहण करतात. ( ' या उपाधिमाजीं गुप्त । चैतन्य असे सर्वगत । तें तत्त्वज्ञ संत । स्वीकारिती ॥ ' ज्ञा. २–१३६ ). अशा विवेकाचें वसतिस्थान संत असतात. ( ' ते विवेकांचें गांव । ' ज्ञा. ५–१६९ ).

जेथें एक वस्तु आहे तेथें दुसरी असलीच पाहिजे. अशा प्रकारचे दृष्टान्त ज्ञानेश्वरमहाराज आणखी देतात–' राजा तेथें सैन्य, प्रेम तेथें नातें, अग्नि तेथें दाहकता, हीं जशी राहणारच

( ' रावो तेथें कटक । सौजन्य तेथें सोईरीक । वन्हि तेथें दाहक । सामर्थ्य कीं ॥ ' ज्ञा. १८-१६३३ ); किंवा गुरु तेथें ज्ञान, ज्ञान तेथें आत्मदर्शन आणि आत्मदर्शन तेथें समाधान जसें येतेंच, ( ' गुरु तेथ ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन । दर्शनीं समाधान आथी जैसें ॥ ' ज्ञा. १८-१६३६ ); अथवा जेथें सूर्य तेथें प्रकाश हा जसा सदा असावयाचाच ( ' हें असो तेथ प्रकाशु । सूर्य जेथें ॥ ' ज्ञा. १८-१६३७ ); या सर्व दृष्टान्ताप्रमाणें भगवान् श्रीकृष्ण हे स्वतः विजयस्वरुपच असल्यामुळें ते ज्या पक्षाला उभे आहेत, त्या पक्षाला जय हा ठरलेलाच समजावा ( ' कृष्ण विजयस्वरूप निजांगें । तो राहिला असे जेणें भागें । तैं जयो लागवेगें तेथंचि आहे ॥ ज्ञा. १८-१६४० ).

तात्पर्य, प्रस्तुत श्लोक हा आमच्या भारताच्या संस्कृतीचा निदर्शक आहे व ज्याप्रमाणें अग्नि हा एका वातीच्या टोकावर बसून सूर्यप्रकाशाचें काम करतो, त्याप्रमाणें सर्व महाभारताचें तात्पर्य महामुनि व्यासांनीं या श्लोकांत आणून ठेवलें आहे. ' यतो धर्म-स्ततो जयः ' हें आम्हां भारतीयांचें ब्रीदवाक्य आहे कारण जेथें धर्म आहे तेथें भगवंताचा अधिवास आहे व जेथें भगवंताचें अधि-ष्ठान तेथें लक्ष्मी, यश, कीर्ति व शाश्वत कल्याण हीं ठेवलीलींच आहेत. आपणांस जर खरोखर आपलें राज्य ' रामराज्य ' व्हावें असें वाटत असेल, तर आपण ईश्वरावर विश्वास ठेवून अखंड सत्कर्म करीत राहावें व नीतीनें आणि सदाचरानें वागावें. केवळ पैसा, शक्ति व युक्ति यानें टिकाऊ यश व वैभव प्राप्त होत नाहींत. बुद्धि जरी चांगली असली तरी आयत्या वेळीं योग्य युक्ति सुचे-लच असें सांगतां येत नाहीं; कारण बुद्धिचा दाता व प्रकाशक हा परमात्मा आहे. ' बुद्धीचा जनिता लक्ष्मीयेचा पति । ' तुका. २०८९ ) योग्य वेळीं योग्य बुद्धि सुचणें ही गोष्ट ईश्वराधीन आहे. ईश्वराला यश द्यावयाचें असलें म्हणजे सर्व कांहीं योग्य घडत असते. तुकाराममहाराज म्हणतात. कीं, जे भगवंताला आप-लासा करतात, त्यानांच शाश्वत यश, कीर्ति आणि मान हीं प्राप्त

होतात—' यश कीर्ति मान । जरी जोडे नारायण ॥ ' (तुका. २५५) प्रस्तुत श्लोकांत ग्रथित केलेल्या सिद्धान्तावरच विश्वास ठेवून आजपर्यंत अनेक थोर महात्म्यांनीं स्वार्थत्याग केला व त्यांपैकीं कांहींना त्यांच्या जन्मांत जरी यश लाभलें नाहीं व त्यांचा छळ झाला, तरी पण अंतीं त्यांना शाश्वत सुखाचाच लाभ झाला व त्यांची कीर्ति दिगंत होऊन राहिली. या बाबतींत ज्ञानेश्वरमहाराजांसारख्या साधुसंतांचीं व इतर अनेक धर्मवीरांची व राष्ट्रवीरांचीं उदारणें प्रसिद्ध आहेत. शेतांत बीं पेरल्यानंतर एका बीजाचा नाश झाला असें दिसतें परंतु कांहीं काळानंतर त्या एका बीजांतून कणीस निर्माण होतें. तुकारामबुवा म्हणतात—' एका बीजा केला नाश । मग भोगिलें कणीस ॥ तुका म्हणे रणीं । जीव देतां लाभ दुणी ॥ ' (तुका. २७९३) या न्यायानुसार धर्माचरणाचें व स्वार्थत्यागाचें फल आज जरी दिसलें नाहीं तरी कांहीं काळानंतर तें निश्चित प्राप्त होईल. अशा प्रकारची श्रद्धा निर्माण करणारा हा गीताग्रंथ आहे. म्हणून प्रत्येकानें गीतेचा अभ्यास करावा. गीतेंत जें जीवन सांगितलें आहे, त्याप्रमाणें आपलें जीवन घालविण्याचा प्रयत्न करावा. मंगलरूप व मंगल करणारा असा जो परमात्मा त्याला नित्य आठवीत जावें; कारण त्यानेंच जीवाला यश; कीर्तिः शाश्वत सुख व खरें समाधान हीं प्राप्त होणारीं आहेत.

---

# ३

"भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन।
ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप॥"

— गीता ११-५४

प्रस्तुत प्रवचनाचा श्लोक हा गीतेच्या ११ व्या अध्यायांतील ५४ वा श्लोक आहे. या श्लोकाचें महत्त्व काय आहे व ज्ञानेश्वर-महाराजांनीं त्यावर काय लिहिलें आहे, हें सर्व सांगण्यापूर्वीं प्रथमतः या श्लोकाचा भावार्थ सांगणें आवश्यक आहे- तो असा--

भगवंत म्हणतात, 'हे परंतप अर्जुन!' – म्ह० 'हे शत्रूंना ताप देणाऱ्या अर्जुना!' 'एवंविधः अहम्!' म्ह० 'अशा प्रकारचा अर्थात् विश्वरूप-प्रकारानें युक्त असलेला मी, म्हणजेच माझें विश्वरूप'; 'तत्त्वेन ज्ञातुं शक्यः' म्ह० 'सम्यक् जाणणें शक्य आहे'; 'च द्रष्टुं शक्यः' – तसेंच पहाणें शक्य आहे'; 'च प्रवेष्टुं शक्यः' – 'आणि त्यांत प्रवेश करणें म्ह० मत्स्व-रूपानें त्यांस लीन होणेंहि शक्य आहे.' पण हें सर्व कशानें शक्य

होईल ? तर भगवंत सांगतात— ‘ तु अनन्यया भक्त्या ’ —पण ‘ केवळ ’ अनन्य भक्तीनेंच ’ हें सर्व शक्य आहे. सारांश, ‘ हे शत्रुतापना अर्जुना ! तुला जसें एकनिष्ठ भक्तीमुळें माझें विश्वरूप दृग्गोचर झालें, तसें हें माझें विश्वरूप ज्ञानगोचर होण्यास, त्याचें दर्शन घडण्यास व त्याच्याशीं समरस होण्यास केवळ अनन्य भक्ति हेंच एकमेव साधन आहे. येथें अन्य साधनांचा लाग लागत नाहीं. ’ असा ह्या श्लोकाचा थोडक्ययांत भावार्थ आहे.

प्रस्तुत श्लोकांत ‘ तु ’ ( म्ह० पण; परंतु ) हें जें अव्यय आलेलें आहे, तें पक्षांतरबाधक उभयान्वयी अव्यय आहे दोन वाक्य किंवा दोन शब्द जोडणारे जे शब्द त्यांना ‘ उभयान्वयी अव्ययें ’ म्हणतात. उदाहरणार्थ, ‘ व, आणि, पण, परंतु ’ इत्यादि. आतां हीं सर्व अव्ययें जरी वाक्यें जोडीत असलीं, तरी पक्षांतरबोधक अव्ययाचा जोडण्याचा प्रकार कांहीं वेगळा असतो. हें लक्षांत येण्याकरितां एक उदाहरण देतों.

कल्पना करा, आपल्याला एखाद्या गृहस्थाकडे जेवावयाचें आमंत्रण आलेलें असतें. जावयाचें तर नसतें. सपशेल नकार तर देतां येत नाहीं. अशा स्थितींत मोठी पंचाईत पडते. मग मनुष्य बुद्धीचा उपयोग करतो. तो आमंत्रण देण्यास आलेल्या गृहस्थास म्हणतो, “ अहो ! तुम्ही स्वतः कशाला बोलवावयास आलांत ! दुसऱ्या कोणा घरच्या पोराला जरी पाठविलें असतें तरी चाललें असतें. एवढें तरी कशाला ? तुमच्या घरा कांहीं कार्य आहे असें जरी नुसतें कळलें तरी न बोलावतांहि तुमच्याकडे यावयास पाहिजे असा तुमचा–आमचा दाट घरोब्याचा संबंध आहे. ‘ परंतु ’ काय करावें ? आमची त्याच दिवशीं परगांवाला कोर्टाची तारीख आहे, त्यामुळें येतां येत नाहीं, याबद्दल क्षमा करावी. ” यांतील ‘ परंतु ’ या अव्ययानें मागील सर्व जें सांगितलें त्याच्यावर बोळा फिरविला गेला. तसेंच प्रस्तुत श्लोकांत भगवंत ‘ तु ’ हा शब्द योजून

' अनन्य भक्ति ' हें साधन मागील श्लोकांत जीं तपदानादि साधनें सांगितलेलीं आहेत, त्याहून कसें भिन्न आहे व अतएव माझ्या विश्वस्वरूपाचें ज्ञान करून देण्यास व त्याच्यांत प्रवेश करून देण्यास कसें सामर्थ्यवान् आहे, तें सांगतात ( ' नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया । शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ भक्त्या त्वनन्यया शक्यः । ' गीता ११–५३–५४ ).

गीतेंत जे कांहीं महत्त्वाचे श्लोक आहेत व प्रसंग आहेत, त्यांपैकीं हा एक महत्त्वाचा श्लोक आहे व प्रसंगहि आहे. ज्ञानेश्वरमहाराजांनीं नवव्या अध्यायाचें महात्म्य वर्णन करीत असतांना गीतेचे सर्व अध्याय जरी महत्त्वाचे असले तरी प्रत्येक अध्ययाचें वैशिष्टय वेगवेगळें आहे असें सांगितलें आहे. तें सांगतांना त्यांनीं एक सुंदर दृष्टान्त दिला आहे- ते म्हणतात, " एकाच उसाच्या रसापासून जरी गूळ, साखर व राब निमाण होत असलीं तरी या प्रत्येक पदार्थाच्या गोडीचा स्वाद निरनिराळा आहे ( ' अहो गूळा साखरे माल्याचे । हे बांधे तरी एकाचि रसाचे । परि स्वाद गोडियेचे । आन आन जैसे ॥ ' ज्ञा. १०–३३ ), त्याचप्रमाणें गीतेच्या सर्व अध्यायांत जरी ब्रह्मरसाचेंच वर्णन असलें, तरीपण प्रत्येकाची गोडी कांहीं निराळी आहे. या दृष्टीनें पाहूं गेलें असतां, प्रस्तुत प्रवचनाचा श्लोक ज्या गीतेच्या ११ व्या अध्यायांत आहे, त्या अकराव्या अध्यायाचें वैशिष्टय कांहीं वेगळें आहे. नवव्या अध्यायांतील कांहीं विषय या ११ व्या अध्यायांतहि आलेला आहे. तेव्हां या ११ व्या अध्यायाचें काय महत्त्व आहे, हें ध्यानांत येण्याकरितां गीतेचें थोडक्यांत समालोचन करणें अवश्य आहे.

मूळ गीताग्रंथ म्हणजे भगवान् श्रीकृष्ण व अर्जुन यांच्यांतील मोकळा संवाद होय ( ' आतां भारत कमलपरागु । गीताख्यु प्रसंगु । जो संवादला श्रीरंगु । अर्जुनेसी ॥ ' ज्ञा. १-५० ), ज्ञानेश्वरमहाराजांनीं संवादाला फार महत्त्व दिलें आहे. आपला ग्रंथ निर्विघ्नपणें तडीस जावा म्हणून ठिकठिकाणीं त्यांनीं आपल्या

गुरूंच्याजवळ जें मागणें मागितलें आहे, त्यामध्यें आपल्या ग्रंथांत काय काय गोष्टी यावयास पाहिजेत व कोणत्या गोष्टी यावयास नकोत, तें त्यांनीं सांगितलें आहे. त्यांपैकीं त्यांनीं अशी एक मागणी केली आहे कीं, माझ्या ग्रंथांत नवरसांचा पुरवठा व्हावा व त्याबरोबरच उत्कृष्ट संवादहि यावेत (संवाद फळ निधानें। प्रमेयाचीं उद्यानें। लावीं म्हणे गहनें। निरंतर ॥' ज्ञा. १२–१३). श्रोत्यांना परमार्थांतील गहन प्रमेयें उत्कृष्ट रीतीनें पटवून देण्यास संवादाचा फार उपयोग होतो. संवाद रचणें ही गोष्ट कांहीं सोपी नाहीं. संवादाची गोष्ट कशाला! साधी गोष्ट सांगता येणें कठिण जातें. कारण गोष्ट अशी कौशल्यानें सांगता यावयास पाहिजे कीं, ती सांगत असतांना गोष्टींतील रस व भाव हीं श्रोत्यांच्या अंतःकरणावर उमटावयास पाहिजेत. ही झाली साध्या गोष्टीची तऱ्हा; यावरून संवाद निर्माण करणें किती कठिण व कौशल्याचें काम आहे, ह्याची कल्पना येईल.

भगवान् श्रीकृष्ण व अर्जुन यांचें रणांगणावर जें प्रश्नोत्तररूप संभाषण झालें, तें कांहीं पद्यांत झालें नाहीं. अर्जुनानें कांहीं श्लोकांत प्रश्न विचारले नाहींत व भगवंतांनींहि त्याचीं उत्तरें श्लोकांत दिलीं नाहींत. महामुनी व्यासांचा हा जगतावर मोठा उपकार आहे की, त्यांनीं भगवान् श्रीकृष्ण व अर्जुन या दोघांमध्यें जें मोकळें भाषण झालें तें त्यांनीं श्लोकांमध्यें रचून जगताला गीतारूपानें दिलें. नदी वाहात असते परंतु त्या नदीचें पाणी पाटांत आणणें हें कौशल्याचें काम आहे. त्याचप्रमाणें श्रीकृष्ण व अर्जुन यांच्यांतील अफाट, गूढ व शब्दांत न येणारें, असें जें मोकळें भाषण त्याचें अनुष्टुभ वृत्तांत काव्य बनवून महामुनीं व्यासांनी तें वाटेल त्याला तळहातावर घेतां येईल इतकें सोपें केलें ('आणि कृष्णार्जुनीं मोकळी। गोठी चावळिली जे निराळी। ते श्रीव्यासें केली करतळी। घेवों ये ऐसी॥' ज्ञा. १८–१६९७). याशिवाय ज्ञानेश्वरमहाराजांनी या गीताख्य संवादावर मराठींत टीका लिहून त्यांत मूळ गीतेंत असलेल्यापेक्षां अधिक व्यक्ति आणून व आणखी संवाद

रचून मोठी मौज केली आहे. यामुळें गीतेपेक्षां ज्ञानेश्वरी हा ग्रंथ अधिक हृद्य झाला आहे.

संवादांत कोणते विषय येतील हें, जसें प्रश्न करणाऱ्यावर अवलंबून आहे त्याबरोबरच त्याची उत्तरें देणाऱ्यावरहि अवलंबून आहे. कित्येक वेळां प्रश्न करणारा अज्ञ असतो परंतु त्याचीं उत्तरें देणारा मात्र जाणता असावा लागतो. आपण अर्जुनानें गीतेच्या दुसऱ्या अध्यायाच्या प्रारंभींच जो भगवंतास प्रश्न विचारला आहे, तो पहा ना! अजुन म्हणतो, "देवा! मी कांहीं लढाईला भीत नाहीं. किंवा माझ्या शत्रूंना मारावयास भीत नाहीं अथवा माझ्या स्वतःच्या मरण्यालाहि भीत नाहीं. मला जर भीति कशाची वाटत असेल तर ती अधर्माची अर्थात् पापाची. पाप करून जर राज्य मिळत असेल, तर तें मला नको." अर्जुन हा कांहीं आपल्याप्रमाणें अहिंसावादी युगांत जन्मला नव्हता- आमच्यासारख्यांना नुसती दाट तांबडी शाई पाहिली तर भोळ येते. मग साक्षात् रक्त सांडलेलें पाहिलें तर काय होईल हें सांगावयासच नको. अर्जुन असा कांहीं भ्याड नव्हता. तो शूर योद्धा होता. ('तुवा संग्रामीं हरु जिंकिला। निवातकवचांचा ठावो फेडिला। पवाडा तुवां केला। गंधर्वांसी॥' ज्ञा. २-१०) अर्जुनाचें नुसतें नांव ऐकलें कीं, प्रतिपक्षाचें अंतःकरण भीतीनें थरारून जात असे. उत्तर गोग्रहणाच्या वेळीं एकट्या अर्जुनानें सर्व कौरवांचा धुव्वा उडवला होता, एवढा तो पराक्रमी होता ('महावीर अकरा अक्षौहिणी। तुवा येकें नागविले रणांगणी। ज्ञा. १८-१२९६). परंतु अर्जुनाला भीष्मद्रोणादि गुरुजनांना मारण्यानें आपणांस पाप लागेल असें वाटूं लागलें व म्हणूनच तो भगवंताला 'मला धर्म्य काय आहे, तें सांगा.' असें विचारूं लागला ('कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वा धर्मसंमूढचेताः। यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्॥' गीता २-७) तेव्हा ज्या अर्जुनाच्या प्रश्नावरून भगवान् त्यांस उपदेश करूं लागले, तो अर्जुनाचा प्रश्न धर्माधर्मविषयक-नीतिविषय होता व म्हणून या गीताग्रंथांत धर्म-

धर्माबद्दलची चर्चा येणें अगदीं स्वाभाविक आहे. परंतु भगवंतांनीं अर्जुनाच्या या नीतिविषयक प्रश्नास थोडीशी कलाटणी दिली व धर्माचें जें मूळ अध्यात्म तें सांगण्यास ' अशोच्यानन्वशोचस्त्वम् । ' ( गीता० ३–११ ) या श्लोकापासून सुरुवात केली.

तिसऱ्या अध्यांयाच्या प्रारंभीं अर्जुनानें पुन्हां भगवंताला प्रश्न विचारला आहे. तो प्रश्न असा आहे– ' ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन ! तत्किं कर्मणि घोरे–मां नियोजयसि केशव ॥ व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे । तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ ' ( गीता ३–१–२ ). भगवंतांनीं अर्जुनाला गीतेच्या दुसऱ्या अध्यायांत सांख्यविचार प्रामुख्यानें सांगितला व स्थितप्राज्ञाचीं लक्षणें सांगितलीं. हें सर्व ऐकून अर्जुनाला असें वाटलें कीं, एकंदरींत भगवंतांनीं सर्व कर्मजाताचें निराकरण केलें व ही एक त्याच्या दृष्टीनें इष्टापत्तीच आली, कारण सर्व कर्मजातांत झुंजणेंहि आलेंच व यामुळें आतां आपणांस लढावयास नको. ( ' जें कर्मजात आघवें । एथ निराकारिलें देवें । तरी पारुषलें म्यां झुंजावें । म्हणूनियां ॥ ' ज्ञा० २–३७२ ). म्हणूनच अर्जुन भगवंताला विचारतो कीं, " देवा ! कर्मापेक्षां ज्ञान श्रेष्ठ आहे असें जर तुमचें मत आहे, तर मला युद्धाच्या घोर कर्मांत कां घालितां ? " अर्जुनाची व भगवान् श्रीकृष्णाची दाट मैत्री असल्यामुळें अर्जुन या ठिकाणीं अगदीं मनमोकळेपणानें व स्पष्ट भगवंताला बजावतो कीं, " देवा ! असें दुटप्पी बोलून माझ्या बुद्धीला मोह पाडूं नका ! मी लढूं का नको लढूं तें मला निश्चित-पणें सांगा. " अर्जुन जरी इतकें रागावून बोलला तरी भगवंत थंडच होते. ह्याचें कारण असें कीं, जरी मुलगा एखादे वेळीं तावातावानें रागावून वडिलांना बोलला तरीपण वडील ओळख-तात कीं, या पोराला कांहीं कळत नाहीं. वडिलांना खरें हित-कारक काय आहे हें माहीत असल्यामुळें ते मग आपल्या मुलाला योग्य तें सर्व नीट समजावून सांगतात. तसाच प्रकार या ठिकाणीं आहे. भगवंत अर्जुनाला सांगतात, ' अर्जुना ! ज्ञाननिष्ठा व

कर्मयोगनिष्ठा या दोन निष्ठा जरी मीच सांगितलेल्या असल्या तरी त्यांचे अधिकारी मात्र भिन्नभिन्न आहेत, हे तुझ्या ध्यानांत न आल्यामुळें तूं घोटाळ्यांत पडलास व उगीचच रागावलास (' तो उद्देशु तूं नेणसीचि । म्हणोनि क्षोभलासि वायांचि । तरी आतां जाण म्यांचि । उक्त दोन्ही ॥ ' ज्ञा० ३–३४; ' लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयाऽनघ । ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥ ' गीता० ३–३ ).

चवथ्या अध्यायाच्या प्रारंभीं अर्जुनाचा प्रश्न नाहीं; भगवंत हे आपणाहूनच तिसऱ्या अध्यायांतील कर्माचाच विचार पुढें या अध्यायांत सांगतात. परंतु तो सांगण्यापूर्वी प्रथमतः भगवंतांनीं या अध्यायांत निष्काम कर्मयोगमार्गाची प्राचीन गुरुपरंपरा सांगितली आहे. पांचव्या अध्यायाच्या प्रारंभीं अर्जुनाचा पुन्हां प्रश्न आहे व त्याचें स्वरूप साधारणतः तिसऱ्या अध्यायांतील प्रश्नासारखेंच आहे. परंतु या ठिकाणची अर्जुनाची भाषा मात्र सौम्य व नम्रतेची आहे. अर्जुन म्हणतो, ' मी अल्पज्ञ आहे व आपण सर्वज्ञ व अनंत आहांत, तेव्हां मला समजेल अशा सोप्या भाषेंत आपण मला तत्त्वज्ञान सांगा (' ऐसें व्यर्थ हें बोलतां । आम्हां नेणतेयांचिया चित्ता । आपुल्यें चाडे श्रीअनंता । उमजु नोहे ॥ ' ज्ञा० ५–३ ) व मला श्रेयप्राप्तीचा असा मार्ग सांगा कीं, जो आचारण्यास सुलभ व ज्यानें फलप्राप्ति मात्र निश्चितपणें होईल (' जो परिणामींचा निर्वाळा । आचुंबितु ये फळा । आणि अनुष्ठितां प्रांजळा । सावियांचि ॥ ' ज्ञा० ५–७ " मार्ग आचरण्यास किती सोपा असावा या बाबतींत ज्ञानेश्वरमहाराजांनीं अर्जुनाच्या द्वारां एक सुंदर दृष्टान्त दिला आहे, तोच मी थोडासा फरक करून सांगतों.

एखाद्याला फार दूरवरचा प्रवास करावयाचा आहे. मग तो बोरीबंदरला कलकत्ता मेलचें फर्स्ट क्लासचें तिकीट काढतो व रात्रीं बोरीबंदरवर आपल्या जागेवर बिछाना पसरून जो निजतो तो

एकदम सकाळीं भुसावळला जागा होतो. त्याला प्रवासाचे कांहीहि कष्ट पडत नाहींत. कल्कत्ता मेलसारख्या गाड्या तासीं ७० मैलप्रमाणें प्रवास करतात. आतां तर तासी ७०० मैल प्रवास करणारी विमानें निघालीं आहेत. रात्री मुंबईत बसलें कीं, दुसऱ्या दिवशीं सकाळीं उजाडतांना चहा प्यावयास मनुष्य लंडनला पोहचतो. त्याचप्रमाणें अर्जुन म्हणतो. कीं, " देवा ! ज्याप्रमाणें सुखकारक वाहनांत बसलें असतां झोपेंत व्यत्यय न येतां मार्ग तर पुष्कळ कटला जातो, तशा वाहनासारखें मला मोक्षप्राप्तीचें सुलभ साधन सांगावें ( ' जैसें निद्रेचें सुख न मोडे। आणि मार्गु तरी बहुसाल सांडे। तैसें सोकासना सांगडें। सोहपें होय ॥ ' ज्ञा० ५-८ ).

सहाव्या अध्यायाच्या प्रारंभीं व ७ व्या अध्यायांतहि अर्जुनानें प्रश्न विचारलेला नाहीं. आठव्या अध्यायाच्या प्रारभी त्यानें पुन्हां प्रश्न विचारले आहेत. ९ व्या अध्यांत अर्जुनाचा प्रश्न नाही. १० व्या व ११ व्या अध्यायांत प्रश्न विचारले आहेत. १२ व्या अध्यायाच्या प्रारंभीहि त्यानें प्रश्न विचारला आहे व तोहि मोठ्या कौशल्यानें विचारलेला आहे. त्यांत त्यानें भगवंताला व्यक्तोपासक श्रेष्ठ का अव्यक्तोपासक श्रेष्ठ, तें मला सांगा अशी विनंति केली आहे. हा प्रश्न विचारतांना अर्जुनानें आपला आशय फार मार्मिक रीतीनें व विनयानें व्यक्त केला असल्यामुळें भगवंत त्याचा तो प्रश्न ऐकून फार संतुष्ट झाले. असा हा गोड प्रसंग आहे ( ' इया किरीटीचिया बोला। तो जगद्बंधु संतोषला। म्हणे हो प्रश्नु भला। जाणसी करूं ॥ ' ज्ञा. १२-३४ ). पुढें १३, १५, १६ या अध्यायांत अर्जुनाचा प्रश्न नाहीं. १४ व्या अध्यायांत फक्त त्यानें भगवंताला गुणातीत पुरुषाचीं लक्षणें व त्याचा आचार कसा असतो. तें मला सांगा असा प्रश्न विचारला आहे. १७ व्याच्या प्रारंभी ' ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजंते श्रद्धयान्विताः ' ( गीता १७-१ ) असा प्रश्न विचारलेला असून पुन्हा १८ व्या अध्यायाच्या प्रारंभीं भगवंताला त्यानें प्रश्न विचारून सर्व गीत. सारांशरूपानें भगवंतास पुन्हा सांगावयास लावली आहे. ( ' तैसी संपता अवसरी। गीता

आदरविली माघारीं । स्वामीभृत्याचा न करी । संवादु काई ॥' ज्ञा. १८-८५ ). तेव्हा अर्जुनानें विचारलेल्या प्रश्नांवरून गीतेचें समालोचन थोडक्यांत स्थूलमानानें याप्रमाणें करता येईल.

आतां या सर्व प्रश्नांचें आपण जर वर्गीकरण केलें तर त्यांतील कांहीं प्रश्न साधनविषयक अथवा नीतिविषयक आहेत व कांहीं तत्त्वज्ञानविषयक आहेत. परंतु ११ व्या अध्यायांतील प्रश्न अगदीं वेगळ्या जातीचा आहे. या अध्यायाच्या प्रारंभी अर्जुन प्रथमतः आपल्या ठिकाणचा मोह नाहींसा झाला असें सांगून ('मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् । यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥' गीता ११-१ ) मग देवांना म्हणतो की, तुम्ही आतांपर्यंत मला जें तुमचें ईश्वरी स्वरूप सांगितलें व जें मी कानांनी ऐकलें तेच माझ्या या डोळ्यांना प्रत्यक्ष दिसावें अशी मला उत्कंठा निर्माण झाली आहे (' म्हणे हेचि हृदया आंतुली प्रतीती । बाहेरी अवतरो का डोळ्याप्रती । ' ज्ञा. १०-३३१; ' तुझें विश्वरूपपण आघवें । माझिये दिठीसि गोचर होआवें । ऐशी थोर आस जीवें । बांधोनि आहे ॥ ' ज्ञा. ११-८८ ). हा प्रश्न देवाच्या स्वरुपासंबंधीचा आहे; तर ब्रह्म हा तत्त्वज्ञानाचा विषय आहे.

अर्जुनानें मला विश्वरुप दाखवा असा जो प्रश्न केला आहे तें पाहून संजयास अर्जुनाच्या भाग्याचें मोठें नवल वाटलें. भगवान् अर्जुनाच्या हातातील अगदी खेळणें झालें होतें. ' पढविलें पाखरूं ऐसें न बोले । यापरी क्रीडामृगहि तैसा न चले । कैसें दैव एथें मुखाडलें । तें जाणों न ये ॥ ' ( ज्ञा० ११-१७० ). माकडाचा खेळ सर्वांना माहीत आहे. तो खेळ करणारा त्या माकडाकडून हव्या त्या चेष्टा करवून घेत असतो, व तें माकडहि त्याच्या म्हणण्याप्रमाणें वागत असतें. त्यानें माकडाला ' रत्नी कूं समजाव ' असें सांगण्याचा अवकाश, कीं तें माकड लगेच त्याप्रमाणें खेळ करूं लागतें. तद्वतच श्रीकृष्ण अर्जुनाच्या स्वाधीन झाले होते.

मोठ्यानें लहानाबरोबर खेळीमेळीनें वागण्यांत आणखीहि एक हेतु असतो. समजा! एखाद्या गृहस्थाला एखाद्या लहान पोराकडून कांहीं काम करून घ्यावयाचें आहे. मग त्या पोराला तें काम करण्यास उत्साह येण्याकरितां तो पोराला म्हणतो, "आमचा नान्या ना! अगदी वाघ आहे. त्याला काम सांगावयाचा अवकाश की त्यानें तें केलेंच समजा!" असें म्हटलें कीं, नान्या लगेच काम करावयास लागतो. ह्याच्या उलट त्याला रागें भरून शिकवावयाचें असलें म्हणजे भाषा वेगळीच असते. 'हा आमचा नान्यां ना! कसला काम करतो! अगदी रड्या आहे!' तद्वतच ज्ञानेश्वरींत कांहीं ठिकाणीं भगवंत अर्जुनाला अवहेलनेनें बोललेले आहेत. उदाहरणार्थ, 'अर्जुना! तुजसारख्या गांवढ्या अडाणी माणसावर रागावून तरी काय उपयोग! माझें खरें जें विश्वरूप तें टाकून क्षुल्लक असें जें माझें चतुर्भुज रूप, त्या ठिकाणी तूं प्रेम धरतोस हें बरें नव्हे' ('परि नेणसीच गांवढिया। काय कोपों आतां धनंजया। आंग सांडोनि छाया। आलिंगितोसि मा॥' ज्ञा० ११–६२९). परंतु पुष्कळ ठिकाणीं भगवंतांनीं अर्जुनाची स्तुतीच केली आहे. वानगीदाखल उदाहरण द्यावयाचें तर भगवंत म्हणतात, 'हे बुद्धिरूपी स्त्रीच्या पति अर्जुना! आमचें जेवढें व्याख्यान, तेवढेंच तुझें अवधान असल्यामुळें, आज आमची वक्तृत्वतारूपी कन्या विवाहित झाली. कारण तिला तुझ्यासारखें योग्य स्थळ मिळालें ('मग म्हणे गा प्रज्ञाकांता। उजवली आजी वक्तृत्वता। जे बोला-येवढा श्रोता। जोडऽसी॥' ज्ञा० १४–६२)." अशी ही संवादाची मोठी मौज आहे.

अर्जुनानें भगवंताला मला तुमचें विश्वरूप दाखवा, एवढें म्हणण्याचा अवकाश! कीं लगेच भगवंत त्याला म्हणाले, 'हें बघ माझें विश्वरूप' ('पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः। नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च॥' गीता ११–५). परंतु तें त्याला दाखविण्यापूर्वीं अर्जुन हें विश्वरूप पाहूं शकेल की नाहीं, याचा भगवंतानीं विचार केला नाही. यामुळें ज्याप्रमाणें

एखाद्या मुलाच्या हातांत त्याला खाण्याकरितां म्हणून लाडू द्यावा, पण तो इतका टणक असावा की, हातानें तो तर फुटावयाचा नाहीच, पण दातानेंहि फुटायची पंचाईत! म्हणजे त्या मुलाची जशी चमत्कारिक स्थिति होतें, तशीच स्थिति अर्जुनाची झाली. जातां जातां मौज म्हणून सांगावयाची कीं, कांहीं लोक मुद्दाम तूप कमी घालून लाडू वळतात, त्यांत अंतस्थ हेतू असा असतो की, पक्तीत जितकें पक्वान्न कमी खपेल तितकें चांगलें. म्हणजें दिसावयास पक्वानाचा तर आग्रह केला, प्रत्यक्ष खपलें मात्र थोडें! आणखी एक असाच प्रकार सांगावयाचा तर, कांही माणसें लग्नाची आमंत्रणें परगावच्या नातलगांना अशा बेतानें पाठवितात कीं, त्यांना तीं आमंत्रणें लग्नाच्या दिवशींच मिळावींत, म्हणजे ते लग्नाला येऊं शकणार नाहींत. यांत आमंत्रणें पाठवून यजमान तर आपल्या जबाबरीतून मोकळा झालाच पण परगांवच्या नातलगांनीं येऊं नये अशीहि त्यात व्यवस्था झाली. तद्वतच अर्जुनाला भगवंतानी विश्वरुप तर दाखविलें पण विश्वरूप त्याला बघता यावें अशी मात्र भगवंतानी त्याची सोय केली नव्हती. याने भगवंताचा अर्जुनाला फसविण्यांचा मात्र उद्देश नव्हता; तर प्रेमानें बोलण्याच्या भरात अर्जुनाला विश्वरूप पाहण्याकरिता दिव्य दृष्टि देण्याचें अवधान भगवंतास राहिलें नाहीं (' साच विश्वरूप जरी आम्ही दावावें। तरी आधीं देखावया सामर्थ्य कीं द्यावें। परी बोल्त बोल्त प्रेमभावें। बसाळ गेलों ॥ ' ज्ञा० ११-१६१ ). यामुळें अर्जुनाला तें भगवंताचें विश्वरुप दिसेना. ही अडचण ज्या वेळी अर्जुनानें भगवंताला सांगितली त्या वेळेस भगवंतांनीं अर्जुनाला दिव्य दृष्टि दिली व मग अर्जुनाला भगवंताचे विश्वरूप पाहता आलें. ह्या विश्वरुपाचाच उल्लेख भगवंत प्रस्तुत श्लोकात ' एवंविधः अहम् ' या शब्दांत करतात.

भगवंतांनीं अर्जुनाला आपलें विश्वरूप दाखविलें. परंतु अर्जुनाला त्या विश्वरूपाची गोडी नव्हती. पक्वान्नें निरनिराळी असतात व ती सर्व गोडहि असतात. परंतु प्रत्येकाची आवड

निरनिराळी असते. एखाद्याला श्रीखंड आवडतें व त्याला करंजी दिली तर तो ती नको म्हणतो ('दधि मधुरं मधु मधुरं द्राक्षा मधुरा सुराऽपि मधुरैव। तस्य तदेव मधुरं यस्य मनो यत्र संलग्नम् ॥). आतां विराट् स्वरूप हेंहि भगवंताचेंच व शाम-सुंदर चतुर्भुज रूप हेंहि पण भवंताचेंच. पण अर्जुनाचें प्रेम भगवंताच्या सगुण रूपावर होतें. तो सगुणप्रेमी होता. म्हणून त्यानें भगवंताला आपण पुन्हां सगुणसाकार व्हावें अशी विनंति केली व ज्ञानेश्वरमहाराजांनीं या अर्जुनाच्या विनंतीचें समर्थन मोठ्या बहारीच्या दृष्टान्तानें केलें आहे.

समजा! एखादा महाराष्ट्रांतील मनुष्य उत्तर हिंदुस्थानांत यात्रा करण्याकरितां गेला. आपण महाराष्ट्रांतील लोक म्हणजे समशीतोष्ण हवेंतले; परंतु उत्तर हिंदुस्थानांतील काशी, हरिद्वार, गंगोत्री वगैरे ठिकाणीं कडाक्याची थंडी जशी असते असा उन्हाळाहि कडक असतो. अशा ठिकाणीं गेल्यानंतर माणसाला असें वाटतें कीं, आपण पुण्यातील आपलें घर सोडून येथें यात्रा करण्याकरितां कशाला आलों! हा सर्व त्रास सोसून यात्रा संपल्या-नंतर तो आपल्या पुण्यांतील घरीं पुन्हा परत येतो. मग एखाद्या दिवशीं तो आपल्या सर्व स्नेही व नातेवाईक मंडळींना आपल्या घरीं फराळाला बोलावितो, अशी बैठकीच्या वेळीं गप्पांना खरी लज्जत येत असते. घराच्या गच्चीवर चांदण्यांत मंडळी बसलेली असतात, मध्यभागीं फराळाचीं ताटें ठेवलेलीं असतात व मग अशा वेळीं गप्पांना विषय बहुधा यात्रेचाच असतो. मग त्यांतील एखादा स्नेही विचारतो, "काय भाऊसाहेब! एकंदरींत तुमची यात्रा कशी काय झाली?" मग भाऊसाहेब यात्रेचें असें रसभरित वर्णन करतात कीं, सांगावयाची सोय नाहीं. ते म्हणतात, "काय तो गंगेचा रम्य घाट! काय तें स्फटिकासारखें शुभ्र पाणी, असें वाटतें कीं, कायमचेंच तेथें रहावें!" परंतु प्रत्यक्ष हे गृहस्थ जेव्हां यात्रा करीत होते, तेव्हां कंटाळलेले होते. तात्पर्य, ज्याप्रमाणें एकदां यात्रा करून सर्व स्थळे पहावींत व मग त्यांची

आठवण मनांत धरून आपल्या घरीं स्वस्थ मजेत असावें; याच-प्रमाणें अर्जुन भगवंताला म्हणतो, "देवा! तुझें अफाट विश्वरूप पाहिल्यावर तुझें श्यामसुंदर चतुर्भुजरूप हेंच आम्हांस विश्रांतीची जागा आहे ('पैं चराचर विनोदें पाहिजे। मग तेणें सुखें घरीं राहिजे। तैसें चतुर्भुज रूप तुझें। तो विसांवा आम्हां ॥' ज्ञा. ११–५९४).

अर्जुनाचें हें म्हणणें ऐकून भगवंताला मोठें आश्चर्य वाटलें व त्यांनीं त्याला 'हेकल' म्ह० हेकेखोर असेंहि म्हटलें (कोण हे वस्तु पावला आम्हासी। तय; लाभाचा तोषु न घेसी। मा भेणें काय नेणों बोलसी। हेकाडु ऐसा ॥ ' ज्ञा. ११–६१०). दुष्प्राप्य असें विश्वरूप प्राप्त झालें असतांना त्याचा अव्हेर करणें हें किती वेडगळपणाचें होतें हें सांगण्याकरितां ज्ञानेश्वरमहाराजांनीं एक उत्कृष्ट दृष्टांत दिला आहे.

एक दरिद्री माणसाला आपणांस खूप धनलाभ व्हावा अशी इच्छा उत्पन्न झाली. तो देवीचा भक्त होता म्हणून त्यानें धनलाभ होण्यासाठीं ज्या डोंगरावर ती देवी होती त्या डोंगराजवळ बसून देवी सूक्ताचे पाठ म्हणण्यास सुरवात केली. कांहीं कालानंतर ती देवी प्रसन्न झाली व तिनें हा ज्या डोंगराजवळ बसला होता तो डोंगर सोन्याचा होईल असा त्याला आशीर्वाद दिला, आणि नंतर ती देवी अदृश्य झाली. देवीनें आशीर्वाद दिल्याप्रमाणें तो डोंगर सोन्याचा झाला, पण हा गृहस्थ पूर्वीप्रमाणें तेथेंच सचिंत बसून राहिला. त्याना असा संचित पाहून जवळून जाणाऱ्या एका गृहस्थानें त्याला विचारलें. "बुवा! तुम्ही असें सचिंत काय बसला आहांत?" त्यावर तो म्हणाला, "अहो! तुम्हाला दिसत नाहीं का? हें सर्व सोनें आहे, हा सोन्याचा डोंगर आहे व तो देवीनें प्रसन्न होऊन मला दान दिला आहे व यामुळें तो आतां माझ्या मालकीचा आहे." त्यावर तो गृहस्थ त्याला म्हणाला, "अहो! असें जर आहे तर मग तुम्ही डोकें धरून येथें

सचिंत का बसला आहांत ? ” तदनंतर तो देवीचा भक्त म्हणाला, “ अहो ! मी जेथें राहतों तें गांव येथून २० मैल लांब आहे. आतां हें डोंगरांतील सर्व सोनें माझ्या घरीं न्यावयाचें तर तें वाहून नेण्याकरितां बैलाच्या गाड्या नकोत का ? तेव्हां त्यांचें भाडें देण्याकरितां माझ्याजवळ तर मुळींच पैसे नाहींत व म्हणून मी येथें सचिंत बसलों आहे. ” ( ‘ नातरी सोनयाचा डोंगरु । येसणा न चले हा थोरु । ऐसें म्हणोनि अव्हेरु । करणें घडे ॥ ’ ज्ञा. ११–६२५ ). वास्तविक डोंगरांतीलच थोडेंसें सोनें त्यानें काढलें असतें तर वाहतुकीच्या पैशाची चांगली सोय झाली असती. तद्वतच चतुर्भुज रूपें ज्या मूळ विश्वरूपांतून येतात तें आद्य विश्वरूप अर्जुनाला लाभलें असतांना त्यानें चतुर्भुज रूपाच्यासाठीं खंती करीत बसावें हें अविचारीपणाचेंच होतें ( ‘ तें हें अपरांअपार । स्वरूप माझें परात्पर । एथूनि ते अवतार । कृष्णादिक ॥ ’ ज्ञा. ११–६१४ ). एवढ्याकरितां भगवंतानीं अर्जुनाला सांगितलें कीं, अर्जुना, विश्वरूप हें माझें खरें रूप असल्याकारणानें, हेंच उपासनेला योग्य आहे व म्हणून तूं त्याचाच आश्रय कर. सगुणरूपाविषयीं हव्यास धरूं नकोस ( ‘ पांर पुढतपुढती पांडवा । हा एकु बोलु न विसरावा । जे इये रूपींहूनि सद्भावा । नेदावें निघों ॥ ’ ज्ञा. ११–६३७ ). भगवंतांनीं अर्जुनाला केवळ ज्ञानतेजाचेंच बनलेलें असें आपलें अनंत, आद्य विश्वरुप दाखविलें ( ‘ मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात् । तेजोमयं विश्वमनन्तमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥ ’ गीता ११–४७ ) व तें त्यानें प्रत्यक्ष पाहिलें. जें विश्वरूप भगवंतांनीं अर्जुनाला दाखविलें त्याच्यामागें भगवंतांनीं ‘ सुदुर्दर्शम् ’ ( म्ह० पहाण्यास मिळणें अत्यंत कठिण ) असें विशेषण मागील श्लोकांत योजिलें आहे ( सुदुर्दर्शमिदं रुपं दृष्टवानसि यन्मम । ’ गीता ११–५२ ).

अर्जुनाचा हा प्रश्न, ‘ सुदुर्दर्श ’ असें जें भगवंताचें विश्वरूप त्याच्या प्रत्यक्ष दर्शनाचा व त्याचा अनुभव येण्यासंबंधींचा आहे. नुसतें बुद्धीला कळणें व त्याचा प्रत्यक्ष अनुभव येणें यांत महदंतर

आहे. उदाहरणार्थ, वैराग्य कशाला म्हणतात हें कळणें सोपें आहे, परंतु तें प्रत्यक्ष अनुभवांत व आचारणांत येणें अत्यंत कठिण आहे. आतांपर्यंत भगवंतांनीं अर्जुनाला प्रथमतः साधनांचा उपदेश केला, नंतर त्याला तत्त्वज्ञान सांगितलें व सरतेशेवटीं त्याला त्या व्यापक विश्वरूपाचें प्रत्यक्ष दर्शनहि घडविलें. अशा प्रकारच्या दिव्यमय विश्वरुपाचा प्रत्यक्ष अनुभव कोणत्या साधनानें येईल, यासंबंधींचा विचार भगवंत प्रस्तुत प्रवचनाच्या श्लोकांत सांगत आहेत. तत्पूर्वी भगवंतांनीं कोणत्या साधनांनीं हें विश्वरूप प्राप्त होणें शक्य नाहीं तें सांगितलें.

वेदपठन, यज्ञयागादिक कर्में, दान, तप इत्यादि साधनांनीं या विश्वरूपाचें दर्शन होणार नाहीं ( ' नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया । शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ ' गीता ११–५३ ). दान, यज्ञ, तप हीं सर्व कर्मेच आहेत व त्यांचा उपयोग फक्त चित्तशुद्धीपुरताच आहे ( ' यज्ञो दान तपश्चैव पावनानि मनीषिणाम् । ' गीता १८–५ ). त्याबाबतींत त्यांचा मोठा उपयोग आहे. यांशिवाय सकाम कर्मे केलीं असतां तीं जीवाला फक्त सत्यलोकाची प्राप्ती करून देतात ( ' सीगेचो सत्कर्मे । धाविन्नलीं संभ्रमें । तिहीं बहुतेकीं श्रमें । सत्यलोकु ठाकिला ॥ ' ज्ञा. ११–६१९ ). निष्काम कर्माचरणानें मनाची शुद्धि होत असते. परमात्मप्राप्तीची जी साधना सांगितली आहे तिचा प्रारंभ ' कर्मापासून ' आहे ( ' आदौ स्ववर्णाश्रमवर्णिताः क्रियाः ' रामगीता ) ज्याप्रमाणें इमारत मजबूत होण्याकरितां तिचा पाया भक्कम असावा लागतो, त्याप्रमाणें ज्ञाननिष्ठेची योग्यता होण्याकरितां प्रथमतः निष्काम कर्मांचें आचरण करणें आवश्यक आहे. परंतु कर्मादिकांची शक्ति ही मर्यादितच आहे. आमच्या वैदिक धर्मांत विशिष्ट लोकप्राप्तीचें विशिष्ट टिकीट ठरलेलें आहे. ज्याला स्वर्गांत जावयाचें असेल त्यानें शंभर यज्ञ करणें आवश्यक आहे ( ' जैसा शतमख संपत्ती । स्वर्गीचिये ॥ ' ज्ञा. १५–३० ). ब्रह्मदेव व्हावयाचें असेल तर लागोपाठ शंभर ब्राह्मणजन्म घेऊन जो यथासांग ब्रह्मकर्म करतो

तोच अंतीं ब्रह्मदेव होऊं शकतो ( ' कां शत एक जन्मां । जो जन्मोनि ब्रह्मकर्मा । करी तोचि ब्रह्मा । आनु नोहे ॥ ' ज्ञा. १५—२१ ). नुसता ब्राह्मणजन्म मिळाल्यानें काम भागत नाहीं. ब्राह्मणजन्म मिळाला पण हॉटेलमध्यें ताटवाट्या घांशीतच बसला तर त्या ब्राह्मणजन्माचा काय उपयोग ? ब्रह्मदेव होण्याकरितां त्यानें ब्रह्मकर्मच करीत राहिलें पाहिजे. उत्तमोत्तम कर्मे करीत गेलें तर जीव हा जास्तींत जास्त ब्रह्मलोपर्यंत जाऊं शकतो. परंतु त्या ब्रह्मलोकापासून त्याला कालान्तरानें खाली यावेंच लागतें ( ' एन्हवीं ब्रह्मपणाचिये भडसे । न चुकतीचि पुनरावृत्तीचे वळसे । ' ज्ञा. ८—१५२ ). तात्पर्य, कर्मानें जी गति मिळते तिच्यामागें नाश आहे. तुकाराममहाराज म्हणतात कीं, आम्हाला या कर्माचें सर्व वर्म कळलें आहे. कर्माचें फल नाशिवंत आहे ( ' तुका म्हणे त्यांचें कळलें आम्हा वर्म । जें जें कर्म धर्म नाशिवंत ॥ ' तुका. ८३५ ). तेव्हां कर्मानें आत्मसाक्षात्कार होणार नाहीं. एवढ्याकरितां भगवंत अर्जुनाला सांगतात कीं, ' अर्जुना ! तूं जसें मला माझ्या विश्वस्वरूपांत पाहिलेंस असें वेदाध्ययनानें, तपानें, दानानें किंवा यज्ञानेंहि कोणी मला पहाणें शक्य नाहीं. त्या स्वरूपांत मला पहावयाचें असेल तर त्याला एकमेव उपाय अनन्यभक्ति हाज आहे ( ' भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ॥ ' गीता ११—५४ ).

प्रस्तुत श्लोकांत ' ज्ञातुं, द्रष्टुं व प्रवेष्टुं ' अशीं तीन पदें आहेत. ' ज्ञातुम् ' म्ह० ' शास्त्रतः जाणणें ' नुसतें ' दिसणें ' म्हणजे ' जाणणें ' नव्हें. जवळ वस्तु असली व ती जरी नित्य पहाण्यांत येत असली, परंतु त्या वस्तूचें मोलमान ठाऊक नसेल तर तिचा कांहींहि उपयोग होत नाहीं. याबाबतींत मी एक उदाहरण देत असतों, तें असें—

एक अगदीं अडाणी आदिवासी होता. त्यानें एका चांगल्या श्रीमंत गृहस्थाची सेवा केली. त्याबद्दल बक्षीस म्हणून त्यानें त्या आदिवासीला आपल्याजवळचें भारी किंमतीचें असें मनगटावरचें

ल्हान घड्याळ दिलें. घड्याळ अत्यंत बारीक असल्यामुळें त्याचा टिक् टिक् आवाजहि फारच हळू येत होता. बोलूनचालून तें घड्याळच ! दुसरे दिवशीं त्याची किल्ली संपली, त्याबरोबर तें घड्याळ चालावयाचें थांबलें व त्यामुळें त्याचा आवाजहि बंद झाला. या आदिवासीनें घड्याळ म्हणजे काय चीज आहे ही जन्मांत पाहिली नव्हती. त्यामुळें किल्ली देणें वगैरे त्याला कांहींच माहीत नव्हतें. दुसऱ्या दिवशीं त्यानें तें घड्याळ घेऊन कानाला लावलें तेव्हां त्याला त्या घड्याळाचा टिक् टिक् आवाज ऐकूं येईना. त्याला वाटलें घड्याळ मेलें व म्हणून तें निरुपयोगी झालें. आतां काय करावें, अशा विचारांत तो पडला. मग त्याला असा विचार आला कीं. हें घड्याळ कोणाच्या तरी माथीं मारून काय चार–आठ आणे मिळतील ते वसूल करावेत. म्हणून जवळच एक ल्हानसा गांव होता व त्या गांवांत एक हॉटेल होतें. तेथें त्यानें जाऊन येथेच्छ खाल्लें व पैसे देण्याऐवजीं त्यानें हॉटेलवाल्याला म्हटलें, " हें पाहा ! मजजवळ कांहीं पैसे नाहींत. या पैशाऐवजी मी तुम्हांला हें घड्याळ देतों. " मालकानें तें घड्याळ घेतलें व तो आश्चर्य करूं लागला. मालक हुशार होता. व्यवहारांत जो बारा गांवचें पाणी पितो, त्याला आपण हुशार म्हणतों. परंतु हॉटेल–वाला हा असा असतो कीं, तो बारा गांवच्याच लोकांना काय, तर अनेक गांवच्या लोकांना तो रोज पाणी पाजत असतो. तेव्हां मालक चाणाक्ष असल्यामुळें त्यानें कांहीहि कुरकुर न करतां पैशा-ऐवजीं आनंदानें तें घड्याळ ठेवून घेतलें. त्यांत त्याचा चांगलाच फायदा होता. हा मूर्ख आदिवासीहि आपल्या परीनें खूष होता. त्याला वाटत होतें कीं, आज आपली मोठी चैन झाली; कारण आपणांस फुकटांत खावयास मिळालें. त्याच्याबद्दल आपण हॉटेल-मालकाला काय दिलें, तर मेलेलें घड्याळ ! अशा आनंदांत तो हॉटेलच्या बाहेर पडला. परंतु हा आदिवासी पक्का लबाड नव्हता. त्याचें मन त्याला खाऊं लागलें. म्हणून पुन्हां तो त्या हॉटेलांत गेला. हॉटेलमालकहि त्याला पाहून मनांत विचार करूं लागला

कीं, ही व्याद पुन्हां परत कां आली ? तेव्हां त्यानें त्याला विचारलें, ' अरे ! परत कां आलास ? " तेव्हां तो आदिवासी म्हणाला, " अहो ! तुम्हाला मी काय दिलें तें तुम्हीं नीट पाहिलेंत का ? तें मेलेलें घड्याळ आहे. नीट कानाला लावून पाहा. तें मुळींच आवाज करीत नाहीं. " त्यावर तो हॉटेलवाला म्हणाला, " असूं दे तें मेलेले घड्याळ; मी त्याची पुढची सर्व क्रिया करीन !" या गोष्टीचें तात्पर्य असें आहे कीं, त्या आदिवासी माणसाच्या समोर तें घड्याळ होतें, त्याला तें दिसत होतें; पण त्याचें त्याला यथार्थ ज्ञान मुळींच नव्हतें. तशीच गोष्ट विश्वस्वरूपाच्या बाबतींत आहे. त्याचें प्रथमतः यथार्थ परोक्ष ज्ञान होण्याकरितां शास्त्राचें अध्ययन लागतें.

शास्त्राध्ययनानें त्याचें जरी ज्ञान झालें तरी तेवढ्यानें भागत नाहीं. त्याच्या पुढची पायरी म्हणजे त्याचें प्रत्यक्ष दर्शन व्हावयास पाहिजे; त्याचा तसा अनुभव यावयास पाहिजे. दर्शनाला-अनुभवाला खरें महत्त्व आहे. या बाबतींत आपण ' समं सर्वेषु भूतेषु तिष्ठंतं परमेश्वरम् । विनश्यत्स्वविनश्यंतं यः पश्यति स पश्यति ॥ ' ( गीता० १३–२७ ) या श्लोकावरील ज्ञानेश्वरमहाराजांची टीका पाहा. यावरुन दर्शनाला भगवंत किती महत्त्व देतात तें आपल्या लक्षांत येईल. भगवंत म्हणतात कीं, ' परमात्मा हा सर्व जीवांत व्यापून आहे असें जो अनुभवितो तो खरा ' डोळसांतील डोळस ' म्ह० ' ज्ञान्यांतील खरा ज्ञानी ' आहे ( ' एवं जीवधर्महीनु । जो जीवेंसी अभिन्नु । देखे तो सुनयनु । ज्ञानियांमाजीं ॥ ज्ञानाचा डोळा डोळसां—। माजीं डोळसु तो वीरेशा । हे वस्तुति नोहे बहुवसा । भाग्याचा तो ॥ ' ज्ञा० १३—१०६७ ). असें दर्शन अथवा ज्ञान जरी झालें तरी त्याच्या पुढील पायरी म्हणजे ' प्रवेष्टुम् ' अर्थात् त्याच्याशीं समरस होणें ही आहे. ही समरसता प्राप्त होणें ही कठिणांतील कठिण गोष्ट आहे. ती प्राप्त होण्या-

करितां द्वैत नष्ट व्हावें लागतें.. जोंपर्यंत द्वैत आहे तोंपर्यंत भीति आहे व तोंपर्यंत जन्ममृत्युरूप संसारहि आहे ( ‘ भयं द्वितीयाभिनिवेशतः । ’ ए. भा. २–३७; ‘ दुजे जंव घडे । तंव तंव संसारभय जोडे । ’ ज्ञा० १७–३७६ ). एवढ्याकरितां भगवंतांनीं गीतेच्या १८ व्या अध्यायामध्यें ब्रह्मभावयोग्यता प्राप्त झालेल्या पुरुषाचें वर्णन केल्यानंतर तो पुरुष मी कोण आहे व केवढा आहे, हें तत्त्वतः जाणतो व त्यानंतर तो माझ्यामध्यें प्रवेश करतो, असें म्हटलें आहे ( ‘ भक्त्या मामभिजानाति यावन्यश्चास्मि तत्त्वतः । ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम् ॥ ’ गीता १८–५५ ). ‘ प्रवेष्टुं ’ ही सर्वांत अत्युच्च पायरी आहे, ह्याच्या पलीकडे अधिक प्राप्तव्य नाहीं ( ‘ सा काष्ठा सा परा गतिः ’ कठ. उप- १–३–११; ‘ तियेपरतें कांहीं । निजपणें येथ नाहीं । म्हणौनि म्हणिपे पाहीं । परमसिद्धि ते ॥ ’ ज्ञा० १८–९८३ ).

आतां या श्लोकावर ज्ञानेश्वरमहाराजांनीं जी टीका लिहिली आहे त्यांतील कांहीं ओव्यांचा आपण थोडक्यांत विचार करूं. विशिष्टाद्वैती जे लोक आहेत त्यांना हा श्लोक त्यांच्या मताला पोषक आहे, असें वाटतें. याचें कारण उघड आहे, ‘ प्रवेष्टुं ’ हा शब्द त्यांच्या दृष्टीनें महत्त्वाचा आहे. घरांत प्रवेश करणारा मनुष्य हा साहजिकच घराहून वेगळा असतो.

द्वैती लोक जीवात्मा हा परमात्म्याहून वेगळा मानतात. तेव्हां ‘ अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम् । अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ॥ ’ ( गीता ८–४ ). या श्लोकांत उघड उघड द्वैत सांगितलें आहे असें ते म्हणतात. त्यांना तसें वाटणें साहजिक आहे. कल्पना करा ! एखाद्या ठिकाणीं चार माणसें गप्पा–गोष्टी करीत बसलीं आहेत. त्याच सुमारास बाहेरून एखादा गृहस्थ त्या ठिकाणीं येतो व त्या चार माणसांपैकीं एखाद्याकडे बोट दांखवून म्हणतो, “ अहो, ह्या भाऊसाहेबांसारखा सज्जन मनुष्य आपणांस भेटणार नाहीं. ” अशा वेळीं त्यांतील एखादा गृहस्थ हिरवट

असला तर तो म्हणतो, " हे सज्जन आहेत ! मग आम्ही सर्व काय चोर आहोंत ! " ( ' एका म्हणतां भलें । आणिका सहज निंदिलें ॥ ' तुका. ३३९० ) त्याचप्रमाणें ' अधियज्ञ ' मी आहे असें म्हटल्यानंतर ' अधिभूत व अधिदैवत ' परमात्मा नाहीं, असें वाटतें व यामुळें हा श्लोक द्वैतीमतास पुष्टि देणारा आहे, असा भास होतो; व म्हणून द्वैती लोक ह्याहि श्लोकाचा अर्थ द्वैतपरच करतात. तसाच प्रस्तुत श्लोक आहे.

ज्ञानेश्वरमहाराज हे मोठे प्रतिभासंपन्न व केवलाद्वैती होते. म्हणून जेथें जेथें श्लोकांत द्वैत सांगितलें आहे असें वाटण्याचा संभव आहे तेथें तेथें ज्ञानेश्वरमहाराजांनीं आपल्या टीकेंत त्याचें सोपपत्तिक अद्वैतपर स्पष्टीकरण दिलें आहे. गीतेच्या १३ व्या अध्यायांत असाच प्रसंग आहे. सामान्यतः अद्वैत ब्रह्मतत्त्वाचा मंद अधिकाऱ्यांना बोध होण्याकरितां नेहमीं द्वैत करून सांगावें लागतें. याबाबतींत ज्ञानेश्वरमहाराजांनीं तेथें मोठा मार्मिक दृष्टान्त दिला आहे, तो असा—

आई आपल्या लहान मुलाला जेवावयास घालीत असते. त्याला स्वतःला जेवतां येत नाहीं म्हणून ती त्याला आपल्या हातानें भरवीत असते. कांहीं मुलें जेवतांना खळखळ करतात व मग आई अशा मुलाला गोष्टी सांगून नादी लावते व जेऊं घालीत असते. त्याच्याकरितां तिनें भात कालवलेला असतो. तो भात ज्याप्रमाणें मोठीं माणसें दोन-चार घासांत संपवितात त्याप्रमाणें मुलाला खातां येत नाहीं. म्हणून मग त्याचे लहान लहान घांस करून त्या मुलाच्या तोंडांत घालावे लागतात. मग आई म्हणते, " हा काकाचा ! " नंतर तो घांस गिळल्यानंतर ती त्याच्यापुढें दुसरा घास करते, व म्हणते, " हा मामाचा ! " व असें म्हणत म्हणत ती त्याला तो सर्व भात भरवीत असते. हाच दृष्टान्त देऊन ज्ञानेश्वरमहाराज सांगतात—भगवंत अर्जुनाला म्हणाले, " अर्जुना ! मुलाला जेव्हां जेवावयास घालावयाचें असतें,

तेव्हां एकच घांस वीस भागांत विभागावा लागतो, त्याचप्रमाणें सर्वच आत्मा आहे हें तुझ्या बुद्धींत आरूढ होण्याकरितां आम्हीं एकाच ब्रह्मतत्त्वाचे एक क्षेत्र, एक, ज्ञान एक ज्ञेय व एक अज्ञान असे चार भाग करून तुला सांगितले." ('एऱ्हवीं अवघेंचि आत्मा। हें सांगों जरी वीरोत्तमा। तरी तुझिया मनोधर्मा। मिळेल ना॥ म्हणोनि एकचि संचलें। चतुर्धा आम्हीं केलें। जें अदळपण देखिलें। तुझिये प्रज्ञे॥ पैं बाळ जैं जेवविजे। तैं घांसु विसा टायीं कीजे। तैसें एकचि चतुर्ध्या जें। कथिलें आम्हीं॥' ज्ञा. १३-९४८-५०).

तात्पर्य, ज्ञानेश्वरमहाराज हे स्वतः अद्वैती असल्यामुळें त्यांनीं श्लोकांतील 'ज्ञातुं, द्रष्टुं' व प्रवेष्टुं' या तीन पदांचें व्याख्यान अद्वैताला धरून केलें आहे. 'प्रवेष्टुम्' या पदाचें व्याख्यान त्यांनीं 'तैसें माझिये साक्षात्कारीं। सरे अहंकाराची वारी। अहंकारलोपीं अवधारीं। द्वैत जाय॥' (ज्ञा. ११-६९४) या एका ओवींत केलें आहे. भेदाला अथवा द्वैताला व जीवत्वदशेला कारण परिच्छिन्न आहंत आहे. 'मी देह आहे' अशी परिच्छिन्न अहंता ज्याच्या ठिकाणीं असते त्याला आपल्याहून अन्य वस्तूंची प्रतीति येते. 'तूं' याला कारण 'मी आहे. जेथें 'मी' ही कल्पना नाहीं त्या ठिकाणीं 'तूं' या कल्पनेलाहि वाव नाहीं. सुषुप्तीमध्यें 'मी' चें भान नसतें म्हणून तेथें जगताचीहि कल्पना नसते. प्राप्त पुरुषाच्या ठिकाणचा देहाहंकार व देहाहंकाराला कारण असणारें स्वस्वरूपाचें अज्ञान, या दोहोंचाहि नाश झालेला असतो, म्हणून त्याच्या ठिकाणची द्वैतप्रतीति निःशेष गेलेली असते ('तुका म्हणे जेव्हा गेला अहंकार। तेव्हां आपपर चोळविले॥' तुका. ३६००; 'जीवनाचा झाला ओलावा अंतरीं। विश्व विश्वंभरीं सामावलें॥' तुका. ३५४०). देहाहंकार नाहींसा झाला कीं, जीव हा परमात्म्याशीं समरस होतो. परमात्म्याचा साक्षात्कार म्हणजे दर्शन झालें असतां, अहंकार नाहीसा होतो व अहंकारच्या नाशांत जीव हा ऐक्यभावानें परमात्म्यांत समाविष्ट

होतो ('मग मी तो हें आघवें। एक मीची आथी स्वभावें। किंबहुना सामावे। समरसें तो ॥' ज्ञा. ११-६९५). आतां परमात्म्याच्या विश्वरूपाचा साक्षात्कार व त्याच्याशीं समरसता ज्या केवळ एका अनन्यभक्तीनेंच प्राप्त होतात त्या अनन्य भक्तीच्या स्वरूपाचा आपण थोडक्यांत विचार करूं.

या अनन्य अथवा अव्यभिचारणी भक्तीचें लक्षण सांगतांना ज्ञानेश्वरमहाराजांनीं एक उत्कृष्ट दृष्टान्त दिला आहे. ज्याप्रमाणें आकाशांतून पडणाऱ्या पावसाच्या सरींना पृथ्वीवांचून निराळी अशी गतीच ठाऊक नसते, त्याचप्रमाणें या अनन्य भक्ताच्या अंतःकरणांत ज्या ज्या वृत्ति उत्पन्न होतात व त्याच्या शरीरानें, मनानें व वाणीनें ज्या सर्व कांहीं क्रिया होतात त्यांचा विषय एक परमात्माच असतो. परमात्म्यावांचून त्याला दुसरें कांहींहि गोड लागत नाहीं ('परि तेचि भक्ति ऐसी। पर्जन्याची सुटिका जैसी। धरावांचूेन अनरिसी। गतिचि नेणे। तैसें सर्वभावसंभारें। न धरत प्रेम एकसरें। मजमाजीं संचरें। मीचि होऊनि ॥' ज्ञा० ११-६८६-८८). अन्य आश्रयांचा त्याग करून केवळ परमात्म्याचाच आश्रय करणें, ह्याला अनन्यता म्हणावें अशी नारदांनीं अनन्यतेची व्याख्या केली आहे ('अन्याश्रयाणां त्यागोऽनन्यता।' नारदभक्तिसूत्र—१०). प्रस्तुत श्लोकांत अनन्य भक्तीचा जो परिणाम सांगितला आहे, त्यावरून या अनन्यभक्तीचें लक्षण बांधतां येतें व तें म्हणजे या सर्व चित्रविचित्र भूतांच्या ठिकाणीं परमात्मवस्तूचेंच दर्शन होणें व सर्वत्र देवा-वांचून दुसरें कांहींहि विषय न होणें. अशा प्रतीतीला जो पोहचतो तोंच अनन्यभक्त होय. ('तत्प्राप्य तदेवावलोकयति तदेव शृणोति तदेव चिंतयति ॥' नारदभक्तिसूत्र ५५) ह्याचा अर्थ तो एकाच देवाच्या प्रतिमेला धरून बसतो असें मात्र नव्हे. वास्तविक परमात्मा म्ह० देव एकच आहे ('एको देवः सर्व भूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा' —श्वेताश्वेतरोपनिषद्). कारणब्रह्म म्हणजे मायाविशिष्ट चैतन्य अथवा ईश्वर, हाच सर्वांना

उपास्य आहे व उपासकांच्या सोयीकरितां विष्णु-शिवादि भिन्न भिन्न देवता कल्पिलेल्या आहेत. त्यांना कार्यब्रह्म असें म्हणतात (' उपासकानां कार्यार्थं ब्रह्मणो रूपकल्पना । '). अशा प्रकारें एकाच परमात्म्याच्या जरी विष्णु, शंकर, गणपति, देवी इत्यादि वेगवेगळ्या प्रतिमा असल्या तरी खरा भक्त, देव एकच समजतो. कारण ह्या सर्व देवतां कारणब्रह्माचें उपलक्षण आहेत, असें त्याचें यथार्थ ज्ञान असतें. पाणी या दृष्टीनें जर आपण पाहिलें तर गंगा नदी व सिंधु नद हे सर्व एकच आहेत. गंगेंत बुडी मारली तर बुडी मारणाऱ्याच्या हाताला वेणी लागेल व सिंधु नदामध्यें बुडी मारल्यास तो नद आहे, म्हणून त्याच्या हाताला शेंडी अथवा दाढी लागेल असें मुळींच नाहीं. नदींत बुडी मारा अथवा नदांत बुडी मारा, सर्वत्र एकच एक पाणी हातास लागेल. तद्वतच कोणत्याहि रूपामध्यें परमात्म्याची भक्ति केली तरी भक्ताला सर्वत्र एकच देव अनुभवास येतो. खरा वैष्णव तोच कीं, त्याला कोणत्याहि देवतेचें दर्शन घडलें तरी त्याला विष्णूखेरीज दुसरें कांहींहि दिसत नाहीं. तोच खरा अनन्य भक्त होय. एकाच परमात्म्यानें भक्तकार्याकरितां आपल्याला वेगवेगळीं अशीं हजार नांवें ठेवून घेतलीं आहेत (' नामाचिया सहस्रवरी । नावा इया अवधारीं । सजूनियां संसारीं । तारू जाहलों ॥ ' ज्ञा, १२-९० ). या हजार नांवांमध्यें पहिलें नांव ' विष्णु ' आहे (' विश्वं विष्णुर्वषट्कारः ' ) व ' विष्णु ' शब्दाचा अर्थच सर्वव्यापक ' ( व्याप्नोति ) असा आहे. ' जग अवघें देव ' ( तुका. ३४५४ ) अशी अनुभूति प्राप्त होणें हेंच खरें अनन्यतेचें लक्षण आहे व हाच खरा भाविक अथवा अनन्य भक्त होय. अज्ञानामुळें दक्षिण हिंदुस्थानांत वीर-वैष्णव आणि वीर-शैव इत्यादि भक्तिसंप्रदायांत जे तंटे दिसून येतात, तशापैकीं ही अनन्यभक्ति नव्हे. तुकारामबुवांनीं एका अभंगांत वीर-वैष्णवांची भक्ति कशी एकांगी असते याचें वर्णन केलें आहे (' एका बोटाची निशाणी । परीपाक नाहीं मनीं ॥ वैष्णवांचा धर्म । जग विष्णु नेणे वर्म ॥ '

तुका. २५३३ ) केवळ मौज म्हणून मी आपणांस यासंबंधी एक गोष्ट सांगतों म्हणजे भक्तीच्या नांवावर हे अज्ञानी भक्त किती हास्यापद प्रकार करतात, हें आपल्या लक्षांत येईल.

एक मनुष्य प्रवासास निघाला होता. तो भक्त असल्यामुळें त्यानें आपल्याबरोबर संबळ घेतली होती. संबळ म्हणजें देव ठेवण्याची पिशवी. ती त्याची संबळ प्रवासांत दुर्दैवानें चोरीस गेली. तो भाविक होता. तो जेथें उतरला होता, त्या घरच्या यजमानांनीं त्याला जेव्हां 'स्नानास उठा' म्हणून सांगितलें, तेव्हां तो त्यांना म्हणाला, "अहो! तुम्ही मला स्नानाला उठा म्हणून सांगता, परंतु माझ्याबरोबर मी पूजेचे जे देव आणले होते ते चोरीस गेले आहेत, त्यामुळें माझी मोठी अडचण झाली आहे. कारण देवपूजा केल्याखेरीज मी अन्न ग्रहण करीत नाहीं." तो यजमान फार चांगला मनुष्य होता. आपल्या घरीं आलेला पाहुणा उपाशी रहावा, हें पाहून त्याला बरें वाटेना. अतिथी जर विन्मुख गेला तर तो आपल्याबरोबर यजमानानें आजपर्यंत केलेल्या सुकृताचें पुण्य घेऊन जात असतो असें शास्त्र सांगतें. (' जैसा अपमानिला अतिथि। ने सुकृताची संपत्ति।' ज्ञा. १५–३६५). तेव्हां यजमान त्या पाहुण्याला म्हणाला, "आपल्याला काळजी करण्याचें कारण नाहीं. आमच्या घरीं देव आहेत. आमचें कुलदैवत शंकर आहे" शंकर हें नांव ऐकल्याबरोबर तो पाहुणा म्हणाला. "तें नांव बिलकुल घेऊं नका! मी विष्णुभक्त आहे." यामुळें यजमानापुढें मोठा पेंच-प्रसंग निर्माण झाला. परंतु तो हुशार होता, त्यानें त्यांतून एक तोड काढली. तो पाहुण्यास म्हणाला, "कांहीं हरकत नाहीं. आमच्या शेजारींच दत्ताचें देऊळ आहे व एका दत्तांत विष्णु, शिव व ब्रह्मदेव ह्या तिन्ही देवांना अन्तर्भाव होतो." मनुष्य-स्वभावच असा आहे कीं, जसजसें पोट रिकामें होत जातें, तसतशी एक एक गोष्ट त्याला आपोआप पटावयास लागते. या पाहुण्याला भूक लागली होती व म्हणून त्याला यजमानाचें

बोलणें पडूं लागलें. तो म्हणाला. "ठीक आहे." तेव्हां मालकाच्या घरच्या मंडळींनीं त्याला देण्याकरितां पूजेचें साहित्य तयार केलें. तें साहित्य पाहून तो पाहुणा म्हणाला, "अहो! मला थोडासा कापूस पाहिजे आहे? यजमान म्हणाला, "आपणांस कशाला कापूस पाहिजे आहे? तबकांत फूलवात, अत्तराचा बोळा, वगैरे सव कांहीं ठेवलें आहे." त्यावर तो म्हणाला, "असें पहा! पूजा करतांना मला धूप वगैरे देवाला दाखवावा लागेल. तेव्हां त्याचा सुवास विष्णूबरोबर शिव व ब्रह्मदेव यांच्याहि नाकांत जाईल, तेव्हां त्यांच्या नाकपुड्यात बोळे घालण्याकरितां मला कापूस पाहिजे." याला काय वैष्णव म्हणावयाचें! ही अज्ञानी भक्ति आहे. आमच्या महाराष्ट्रीय संतांनीं या बाबतींत आमच्यावर फार मोठे उपकार केले आहेत. त्यांनीं वेगवेगळ्या देवतांच्या उपासकांमधील असणारा कलह पाहून देवाचें खरें स्वरूप लोकां-पुढें मांडलें व त्यांना खऱ्या परमात्मवस्तूची कल्पना आणून दिली. त्यामुळें दक्षिणेंत जसे वीर–वैष्णव, वीर–शैव इत्यादि तंटे दिसून येतात तसे सुदैवानें आपल्याकडे नाहींत. खरा वैष्णव तोच कीं, जो सर्व जगत् विष्णुमय पाहतो. ('विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म। भेदाभेद भ्रम अमंगळ॥' तुका–३७२७) व त्याला प्रत्येक वस्तूच्या दर्शनांत परमात्मवस्तूचेंच दर्शन होत असतें ('जेथें देखे तेथें तुझींच पाउलें। विश्व अवघें कोंदाटलें। रूप गुण नाम अवघां मेघशाम। वेगळें तें काय उरलें।' तुका–१६०२). तेव्हां 'सर्व विष्णुमयं जगत्' अशा अन्वय बोधावर प्राप्त होतें हेंच खरें अनन्यभक्तीचें लक्षण आहे.

तुकाराममहाराज देवाला सांगतात कीं, आम्ही खरे भाविक आहोंत. तुम्ही कोणतेंहि रूप जरी धारण केलेंत, तरी आम्ही फसणार नाहीं. ('आम्हां भाविकांची जाती। एकविध जी श्रीपती।' तुका–७५१). [कल्पना करा! बालगंधर्वासारखा नट आहे. तो निरनिराळ्या नाटकांत निरनिराळे स्त्रीवेष घेतो. आता आपण फार पुढें गेलों आहोंत! कारण बायकांचे पार्ट आतां

नायकाच करतात ! परंतु जुन्या काळांत पुरुष स्त्रियांचे पार्ट करीत असत. तेव्हां बालगंधर्वांनें जरी रुक्मिणीचा, द्रौपदीचा अथवा भामिनीचा पार्ट घेतला, तरी जो प्रेक्षक असतो तो ओळखतो कीं, हा बालगंधर्वच निरनिराळ्या वेषांत आहे. कारण त्याला त्याच्या मूळच्या यथार्थ स्वरूपाचें ज्ञान असतें. त्याप्रमाणें ज्याला देवाच्या मूळच्या यथार्थ स्वरुपाचें ज्ञान झालें आहे, त्याच्यापुढें देव जरी कुत्र्याच्या रूपानें आले तर तो हा देवच आहे, असेंच म्हणणार ! ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, ( , अनंत रूपें अनंत वेषें देखिलें म्यां त्यासी । बापरखुमादेवीवरु खुण बाणली कैसी ॥ ' ज्ञा. गा. ६६७ ). अज्ञानी भक्तांना हें व्यापक ज्ञान नाहीं. ते परमात्मा हा वस्तुतः अनंत, अखंड, अद्वितीय, अजन्मा, निर्विकार, अव्यय व नामरूपरहित अशा स्वरूपाचा असतांना त्याला मनुष्य देहधारी समजून त्याला निरनिराळे उपचार करतात व त्याच्या मूळ स्वरूपाला विसरतात !

देवाला शेजघर करणें व त्यांत त्याला निजविणें हाहि एक अज्ञानी भक्तीचाच प्रकार आहे. आपल्याकडे अशा उपचारांचे इतकें खुळ नाहीं. परंतु उत्तर हिंदुस्थानांत तें आपणांस फार दिसून येतें. देव हा अखंड जागाच आहे. तुकारामबुवा सांगतात, ( ' जागता जगदे । राखा कांहीं भाव ॥ ' तुका–३२७ ). देव जर खरोखरच निजला तर मग जग कसें चालेल ? देव सर्व ठिकाणीं व सर्व काळांत आहे व म्हणूनच कोठेंहि व केव्हांहि त्याची प्रार्थना केली तरी ती त्याला पोहचते व तो मग भक्तकार्याकरितां धांवून येतो. मग ही प्रार्थना आफ्रिकेंत जरी केली तरी ती त्याला पोहोंचते !

परमात्मा हाच सर्व रूपांनीं नटलेला आहे व तो सर्वांमध्यें सारखेपणानें व्याप्त आहे. ज्ञानेश्वर महाराजांनीं ' समं सर्वेषु भूतेषु तिष्ठंतं परमेश्वरम् । ' ( गीता १३–२७ ) या श्लोकावर टीका करतांना सुंदर लिहिलें आहे. भगवंत अर्जुनाला म्हणतात, " अर्जुना ! या

सृष्टींत भूताचीं नांवें निरनिराळीं, त्यांचे वर्तनक्रम, वेष व स्वरूपेंहि निरनिराळीं, इत्यादि सर्व पाहून तूं आपल्या मनांत हीं भूतें परमात्म्याहून वेगवेगळीं आहेत अशी द्वैताची कल्पना आणशील तर तुला कोट्यावधि जन्म गेले तरी या जन्माच्या यातायातींतून बाहेर पडतां येणार नाहीं " ( ' यांची नामेंहि आनानें आनारिसीं वर्तनें । वेषहि सिनाने । आघवेयांचे ॥ ऐसें देखोनि किरीटी । भेद सूसी हन पोटीं । तरि जन्माचिया कोटी । न लाहसी निघों ॥ ' ज्ञा. १३–१०५८–५९ ). एकाच सोन्याचे सलकडी, गोफ, कंठा, सरी इत्यादि दागिने करतात. परंतु त्या दागिन्यांचे आकार जरी वेगवेगळे असले तरी त्यांत सोनें म्हणून जें कांहीं आहे, तें एकच आहे ( ' सरी चिताक भोंवरी । अलंकारांचिया परी । नामें जालीं दुरी । एक सोनें आटितां ॥ ' तुका. ३४९७ ). ज्याला खरें सोनें कळलें त्याची आकारावर दृष्टि रहात नाहीं व भिन्नभिन्न आकारांनीं तो फसतहि नाहीं. यांच्या उलट ज्याची केवळ आकारावरच दृष्टि खेळलेली असते अशा अज्ञान बालकाला दागिन्यांच्या रूपानें असणारें सोनें, सोनें वाटत नाहीं ( ' अलंकारपणें झांकलें । बाळा सोनें कां वायां गेलें । तैसें नामीं रूपीं दुरावलें । अद्वैत जया ॥ ' ज्ञा. १८-५४२ ). या बाबतींत मी आपणांस एक दृष्टान्त देतों.

एक कालिमातेचें मंदिर होतें. तिच्यांतील देवीचें ध्यान भीतिप्रद होतें. तिच्या गळ्यांत नरमुंडांच्या माळा होत्या, तिनें जीभ बाहेर काढलेली होती, पायाखालीं राक्षस मारलेला होता व हातांत त्रिशूळ होता. देवीची मूर्ति व बाकीचे सर्व सोन्याचेंच बनविलेलें होतें. एक गृहस्थ आपल्या लहान मुलाला बरोबर घेऊन त्या देवीच्या दर्शनाला गेला. देवीचें तें अक्राळविक्राळ स्वरूप पाहून तें मूल घाबरलें व ' बाबा ! चला घरीं, येथें नको, ' असें म्हणूं लागलें. बाप भाविक होता. तो देवीसमोर उभें राहून तिची ' दुर्गे दुर्घट भारीं तुजवीण संसारीं ' अशी आरती म्हणूं लागला. त्यांच्या मागून तिसरा एक गृहस्थ दर्शनाला आला. तो जातीनें अस्सल सोनार होता. त्यानें देवीच्या मूर्तीला पाहतांच त्याचं लक्ष ती मूर्ति ज्या

सोन्याची केली होती, त्या सोन्याकडेच प्रथम गेलें. तो मनांत म्हणूं लागला, " काय कारागिरानें मोठी कसब लढविली आहे हो ! प्रत्यक्ष देवीची मूर्ति शंभर नंबरी सोन्याची केली आहे व तिच्या गळ्यांतील नरमुंडांची माळा मात्र ब्याण्णव नंबरी सोन्याची केली आहे. " सारांश, त्या सोनाराला त्या मूर्तींतील सोनेंच दिसलें, देवी दिसली नाहीं. ल्हान मुलाला आकार दिसला, सोनें दिसलें नाहीं. ज्याला सोन्याचें दर्शन झालें त्याची दृष्टि आकारानें फसत नाहीं. तद्वतच ज्ञानी पुरुषाला परमात्म्याचें खरें स्वरूपदर्शन झालेलें असल्यामुळें त्याची दृष्टि नाम, रूप, आकार व गुण यांच्यावरून उठून सर्व वस्तूंमध्यें व्याप्त असलेलें जें चैतन्य त्याच्यावरच जडलेली असते व म्हणून त्याला सर्व ठिकाणीं आत्मवस्तूचेंच दर्शन होतें ( ' ब्राह्मणे पुल्कसे स्तेने ब्रह्मण्येऽर्के स्फुलिंगके । अक्रूरे क्रूरके चैव समदृकपंडितो मतः ' ए. भा. २९–१४; ' भूतीं देव म्हणोनि भेटतो या जना । नाहीं हे भावना नरनारी ॥ ' तुका. १८५७; ' नर नारी बाळें अवघा नारायण । ' तुका. ८६१ ). सारांश, या श्लोकांत जी अनन्यभक्ति सांगितली आहे ती परिच्छिन्न अशा एका देवतेच्याच आकाराला धरून राहणारी अशी एकांगी नाहीं, तर सर्व विश्वामध्यें व्यापक असणाऱ्या स्वरूपाच्या ज्ञानावर अधिष्ठित अशी असते. अनन्यभक्त हे परमात्म्याला आपल्या सर्व भावांनीं विकले गेलेले असतात. ( ' पै सर्वभावेंसीं उखितें । जे वोपले मज चित्ते । ' ज्ञा. ९–३३५ ) म्हणजे त्यांच्या अंतःकरणांत जी जी वृत्ति उत्पन्न होईल तिची मोहर परमात्माच असते ( ' तैसें सर्वभावसंभारें । न धरत प्रेम एकसरें । मजमाजीं संचरे । मीचि होऊनी ॥ ' ज्ञा. ११–६८८ ).

भगवंतांनीं गीतेंत भक्तांचे चार प्रकार सांगितले आहेत ) ' चतुर्विधा भजंते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन : आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ ' गीता ७–१६ ). भगवंत स्वतः थोर अंतःकरणाचे म्हणून त्यांनीं या सर्व भक्तांना ' उदार ' म्ह० ' चांगले, असें शिफारस पत्र दिलें आहे. परंतु शेवटीं आपलें खरें मनोगत सांगतांनां त्यांनीं

या सर्व भक्तांत ' ज्ञानी भक्त हा केवळ माझा आत्माच होय ' असें म्हटलें आहे ( ' उदाराः सर्वं एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ।' गीता ७–१८ ). याचें कारण एक ज्ञानी भक्त सोडून बाकी सर्व भक्त आपापला स्वार्थ साधण्याकरितां देवाची भक्ति करीत असतात. गाईच्या स्तनाला गोचिड लागते व वासरूंहि लागतें. किंबहुना गोचिड ही गाईच्या स्तनाला चोवीस तास चिटकलेली असते. परंतु गाईचें प्रेम गोचिडावर नसतें वासरावरच असतें. कारण गोचिड ही तिचें रक्त शोषण करण्याकरितां तेथें बसलेली असते. आर्त भक्त हा गोचिडीप्रमाणें आहे. कोणी देवाला म्हणत असतो, " देवा ! सगळे कांहीं बरें आहे ! पण रांगतें नाहीं. " कोणी म्हणतो, ' बायको नाहीं, पैसा नाहीं इत्यादि. ' परंतु देवाचें खरें प्रेम आपल्या ज्ञानी भक्तावरच असतें. कारण त्याची भक्ति निष्काम असते ( ' म्हणोनि आपुलाल्या हिताचेनि लोभें । मज आवडे तोहि भक्त ज्ञोंवे । परी मीचि करी वालभें । ऐसा ज्ञानिया एकु ॥ मग चौथियाच्या ठायीं । कांहींचि करणें नाहीं । म्हणौनि भक्तु एकु पाहीं । ज्ञानिया जो ॥ ' ज्ञा. ७–११९–१११ ), व तो देवामध्यें नाहींसा झालेला असतो. याला वस्तुतंत्र शरणगति म्हणतात. आपणासकट सर्व परमात्मा मीच आहे अशा दृढ अपरोक्षानुभवावर प्राप्त होऊन भगवंताचीच अखंड भक्ति करीत राहणें याला पराभक्ति अथवा वस्तुतंत्र शरणागति म्हणतात ( ' परि जाणोनिया मातें । जो पाहों विसरला मागौतें । जैसें सागरा येऊनि सरिते । मुरडावें ठेलें ॥ तैसी अंतःकरणकुहरीं उपजली । जयाची प्रतीतिगंगा मज मिनली । तो मी हें काय बोली । फार करूं ॥ ' ज्ञा. ७–१२४–२५ ). प्रस्तुत प्रवचनाच्या श्लोकांतील अनन्य भक्तीचें ज्ञानेश्वरमहाराजांनीं जें वर्णन केलें आहे, तें अशा प्रकारचेंच आहे. ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, " त्या अनन्यभक्ताच्या परमात्म्यापासून तों क्षुद्र अशा मुंगीपर्यंत सर्व चराचर परमात्माच आहे, तद्व्यतिरिक्त दुसरें कांहींहि नाहीं असा बोध असतो ( ' तैसे मजलागुनी मुंगीवरी । किंबहुना चराचरीं । भजनासी कां

दुसरी । परीचि नाहीं ॥' ज्ञा. ११–६९० ' व यामुळें जगामध्यें भजनाला त्याला परमात्म्याशिवाय दुसरा विषयच शिल्लक राहात नाहीं. ज्ञान व भक्ति ह्यांचा हा उत्कृष्ट समन्वय आहे. 'सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते । अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्विकम् ॥' (गीता १८–२०) अशा प्रकारचें त्याचें अव्यभिचारी ज्ञान असतें. 'जें कांहीं आहे तें वासुदेव आहे' अशा प्रकारचें सर्व ठिकाणीं ज्याला देवाचें दर्शन होतें तो महात्मा अत्यंत दुर्मिळ आहे, असें भगवंत सांगतात ('वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥' गीता ७-१९).

प्रस्तुत श्लोकाच्या पुढील जो 'मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः । निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव ॥' (गीता ११–५५) श्लोक आहे त्यांतहि भगवंतांनीं या अनन्यतेचेंच वर्णन केलें आहे, तें असें–'जो मजचि एकलागीं । कर्मे वाहातसे अंगीं । जया मी वांचोनि जगीं । गोमटें नाहीं ॥' ज्ञा. ११–६९६). या अनन्य भक्तिच्या प्राप्तीचा मार्ग नारदभक्तिसूत्रांत पुढीलप्रमाणें सांगितला आहे—'तत्तु विषयत्यागात् संगत्यागाच्च । अव्यावृतभजनात् । लोकेऽपि भगवद्गुणश्रवणकीर्तनात् । '(नारदभक्ति सूक्तें ३५–३७). भगवंताचा अखंड वेध लागणें हें या भक्तीचें मुख्य अंग आहे ('बोलावा विठ्ठल पाहावा विठ्ठल । करावा विठ्ठल जीवभाव ॥' तुका. ३४४८). नवव्या अध्यायांतहि भगवंतांनीं सांगितलें आहे कीं, 'अर्जुना, माझ्या स्वरुपांत प्रवेश करण्याला उपायांची म्हणजे साधनांची उणीव नाहीं ('म्हणौनि पार्था पाहीं । प्रवेशावया माझां ठायीं । उपायांची नाहीं । वाणी एथ ॥' ज्ञा. ९–४७१). माझ्याकडे वाटेल त्या मार्गानें येतां येतें, भक्तीनें प्रल्हादादिकांना, विषयबुद्धीनें गोपींना, विरागानें शुकांना व द्वेषानें शिशुपालदिकांना भगवंताचें ध्यान लागलें व म्हणून त्या सर्वांना सायुज्यमुक्तीचाच लाभ झाला ('अगा मी एकालाणीचें खागें । मज येवों ये भलतेणें मार्गें । भक्ती कां विषयें विरागें । अथवा वैरें ॥'

ज्ञा. ९-४७० ). प्रेम करावयाचे असेल, ज्ञान प्राप्त करून घ्यावयाचें असेल तर त्यासाठीं भगवंतच विषय करावयास पाहिजे. सर्व वृत्ति भगवंताच्याकडेच लावावयास पाहिजेत. गोपींनाहि असाच परमात्म्याचा वेध लागला होता ( ' एक विषय तो सकाळांचा हरि । त्याच्या आवडीनें आवघडी इतरी । ' तुका.१११ ). पूर्वी त्यांच्या ज्या आवडी होत्या त्या आतां बदलल्या. पूर्वी हा भाऊ, हा पति, हा मामा अशा निरनिराळ्या नात्यानीं त्या वेगवेगळ्या लोकांवर प्रेम करीत होत्या. परंतु आतां त्याचा सर्व विषय परमात्माच बनला ( ' गोविंद भ्रतार गोविंद मूळहारी । नामें भेद परी एकचि तो ॥ ' तुका. २५ ). ही अनन्य अथवा एकान्तिक भक्ति होय. एका भावाची भक्ति म्हणजे भक्ताला सर्वत्र परमात्माच दिसतो, तद्व्यतिरिक्त त्याला दुसरें कांहींहि दिसत नाहीं.

प्रस्तुत श्लोकांतील ' प्रवेष्टुम् ' या पदानें किंवा ' भक्त्या मामभिजानाति ' ( गीता १८-५५ ) या श्लोकांतील ' विशते ' या पदानें ज्ञानी भक्त परमात्म्यांत प्रवेश करतो असें म्हटले आहे. भक्त हा परमात्म्यांत प्रवेश करतो. ह्याचा अर्थ ज्याप्रमाणें भुंगा हा कमळांत जाऊन बसतो, तसा तो परमात्म्याच्या स्वरूपांत शिरतो असा नाहीं. ह्याची स्पष्टता होण्याकरितां ज्ञानेश्वरमहाराजांनीं कापुराचा दृष्टान्त दिला आहे. " देवासमोर कापूर लावला म्हणजे तो अग्नीनें पेटवला, कीं कापूर जळतो, म्हणजे त्याचे मागें कांहींहि शिल्लक राहात नाहीं. इतकेंच नव्हे तर, ज्या अग्नीनें कापराला जाळलें, तो अग्नीहि नष्ट होतो. शेवटीं ज्या आकाशांत हा कापूर जळण्याचा व्यवहार झाला तेवढें आकाश मात्र शिल्लक राहते. " ( ' जेव्हां कापुर जळों सरे । तयाचि नाम अग्नि पुरे । मग उभयातीत उरे । आकाश जेवीं ॥ ' ज्ञा. १८-१२११ ). तद्वतच भक्ताची पूर्वीची ' देहोऽहं ' ही वृत्ति, ही गुरुपासून ' तत्त्वमसि ' या महावाक्याच्या श्रवणानें नाहींशीं होते व तिच्याऐवजीं ' अहं ब्रह्मास्मि ' अशी वृत्ति उत्पन्न होते. परंतु हीहि वृत्ति बंधात्मकच आहे. ( ' तैसा ज्ञानरूप

आत्मा । ज्ञानेंचि आपुली प्रभा । करितसे सोहं मा । ऐसा बंधु ॥ ' अमृ–३–२६ ). म्हणून कांहीं काळानंतर ' अहं ब्रह्माऽस्मि ' हीहि वृत्ति नष्ट होते व शेवटीं ह्या दोन्ही स्फुरणरहित व सर्व धर्मशून्य अशी केवळ ज्ञानमात्र ' आत्मवस्तु ' शिल्लक राहते. जीवानें, वृत्तीनें अशा आत्म्याशीं तद्रूप होऊन जाणें व आत्मस्वरूपानें राहणें हेंच त्याच्यांत प्रवेश करणें आहे. हा प्रवेश म्हणजे अल्प आकाशानें महदाकाशांत प्रवेश करण्यासारखा आहे. होळी पेटवावी लागते, परंतु ती विझवावी लागत नाहीं. कारण विस्तवाचें अस्तित्व लाकडांवर असतें. लाकडें जळून संपलीं कीं, त्याबरोबर त्या लाकडांना जाळणारा अग्नीहि नष्ट होतो. तद्वतच अज्ञानाला जाळणारें ज्ञान अज्ञानाला जाळून आपणहि नामशेष होतें. ( ' ऐसी जळों सरलिया माया । तेथ जाळितें तेंही सरे ॥ ' ज्ञा.– ८–५८ ). ज्ञानहि नाहींसें झाल्यानंतर मग काय उरतें तें शब्दांनीं सांगतां येत नाहीं. त्या बोधांत ' तो ' आणि ' मी ' म्हणजे भक्त. आणि परमात्मा हें जें द्वैत आहे तें संपतें व ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान; द्रष्टा, दृश्य, दर्शन; भोक्ता, भोग्य, भोग इत्यादि सर्व त्रिपुटी नाहींशा होऊन केवळ सुखमात्र असा जो आत्मा तो एकच एक शिल्लक राहतो. ( ' ऐक्याचें एकपण सरे । जेथ आनंद कणुही विरे । कांहींचि नुरोनि उरे । जें कांहीं गा ॥ ' ज्ञा. १८–१००५; ' आणि मी तो हे भाषा जेथ जाये । तेथें मी हें कोण्हासी आहे । ऐसा मी ना तो तिये सामाये । माझ्याचि रूपीं ॥ ' ज्ञा. १८–१२१० ). त्याठिकाणीं हा प्रवेश अथवा हें ऐक्य जाणण्यास साक्षी असा कोणीच राहत नाहीं. हें ऐक्य जो अनुभवितो तो शिल्लक राहतो व तोच सुखमात्र आत्मा होय. ( ' तैसें द्रष्टा दृश्य हें जाये । मग कोण म्हणे काय आहे । हेंचि अनुभवें तेंचि पाहे । रुप तया ॥ ' ज्ञा. १५–५४४ ). अशा प्रकारची स्वरुपसमरसता ही केवळ अनन्यभक्तीनेंच प्राप्त होते, असें भगवंत प्रस्तुत श्लोकांत सांगतात.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

प्रा. सोनोपंत दांडेकर यांचें

'जय जय वो शुद्धे । उदारे प्रसिद्धे ।
अनवरत आनंदें । वर्षातिये ॥'

□ □ □

या सुप्रसिद्ध श्रीज्ञानेशांच्या ओवीवरील

# प्रवचन

